# झाली फुले कळ्यांची

विठ्ठलराय भट



मोरया
प्रकाशन
सुविचार आणि सुसंस्कार
यांचा प्रसार हाच आमचा विचार



• प्रकाशक / मुद्रक :
दिलीप महाजन/ गौरी देव
मोरया प्रकाशन
'अनुश्री', ४०/१० एरंडवणा, पुणे ४११०३८.
मो. ९२२३५०१७९७, ९२२३५०१०५२
६, 'दिव्यकुंज',सुदर्शननगर, R10 एम.आय.डी.सी.,
डोंबिवली (पूर्व) - ४२१ २०३
email : info@morayaprakashan.com
web : www.morayaprakashan.com



• पहिली आवृत्ती : २६ जानेवारी २०१५
• अक्षरजुळणी : आसावरी महाजन

• मुद्रणस्थळ :
स्वाती मुद्रण, गोपी टॉकीजजवळ,
डोबिंवली (प.)

• मुखपृष्ठ फोटो :
श्री. शरद मा. बोरकर यांच्या बागेतील फुले
नंदनगद्दे (कारवार)

• मूल्य : रू. १२५/-





विठ्ठलराय भट

जन्म - ५ मे १९३५ कडवाड (कारवार)

नोकरी - सरकारी, निमसरकारी, खाजगी अशा वट्ट पंधरा आस्थापनांत नोकऱ्यो करुन निवृत्त (३१-१२-९२)

## लेखन

⏭ चरित्र

१५ भारतीय रत्ने, क्रांतीवीर भगतसिंग, चेराबंडा राजू-(तुरुगांया स्वामी), भारतीय नवरत्ने, जे.एफ्. रिबेलो, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, भारतमातेचे निवडक सुपुत्र, भारतरत्न मानकरी, सोनिया गांधी- एक गूढ व्यक्तिमत्त्व, डॉ. अमर्त्य सेन, युगपुरुष पंचक, दुरदेशीचे जीवलग, नादब्रम्हाचे मानकरी, मर्दानी झांशीवाली, कर्मयोगिनी अहिल्याबाई होळकर, नेताजी

⏭ विनोद

अजब भारतीय, आम्ही हे असे !

⏭ लेख संग्रह (ललीत)

मोर नाचरा हवा, सोनफुले, बारा लेख

⏭ तत्वज्ञान

अधात्मवाद-फेरमांडणी

⏭ आत्मचरित्र

नोकरनामा, जांबावली ते आंबिवली, इए गृंथाचिए नगरी

⏭ साहित्य विशयक

सरस्वतीचे दशपुत्र, ज्ञानपीठ मानकरी

⏭ संकिर्ण (हेर)

चकवा, नालंदा व तक्षशिला (ब्रेल लिपींत भाशांतर जाला)

बहुभाषिक समानार्थी इंद्रधनुषी म्हणी गोड गोड भक्ति गिते

⏭ कोंकणी

पोंवळ्या माळ, घाण्याचे बैल (कथासंग्रह), गीतांजली (कोंकणी गीतां)

⏭ इंग्लिशींत प्रकाशीत जाल्लीं ५३ पुस्तकां

इंग्लिस माध्यमांतल्यान शिकपी विद्यार्थ्यांक मदत जावची म्हण

Caleidoscope, Rainbow, Bouque, 50 Booklets (Personalities form)

⏭ पुरस्कार

अमेरिकन बायोग्राफिकल इन्स्टिटयूटावतीन Man of the Year 1996 हो पुरस्कार दिवन सन्मानीत केला. (अपंगत्व, गरिबी, शिक्षणाची असुविधा अशा अडचणींचेर मात करुन जिद्दीन सामाजीक, शिक्षणीक आनी साहित्य मळार उल्लेखनीय कामगिरी/वावर केल्याखातीर)

# मैत्र जीवांचे



डावीकडून :

१) सौ. सुफला रुद्राजी गायतोंडे
प्रख्यात कोंकणी-मराठी लेखिका, कवी. अनेक पुरस्कार प्राप्त.
'रूद्रा' प्रकाशन संचालक, एकूण सात पुस्तके प्रकाशित

२) श्री. विठ्ठलराय भट, लेखक

३) श्री. एन्. शिवदास
साहित्य अकादमी पुरस्कार प्राप्त
कोंकणी-मराठी लेखक, कवी, नाटककार
माजी अध्यक्ष : गोवा कोंकणी अकादमी

# मनोगत



सहा भाषांतील (संस्कृत, मराठी, कोंकणी, हिंदी, कन्नड व इंग्रजी) उत्तमोत्तम साहित्य वाचून मनःपूत आनंद भोगला. ती वाचनाची आवड आजतागायत तगून आहे. आता उतारवयात वाचनानंद हाच माझा आनंदाचा कंद आहे.

वाचनातूनच पुढे लिहिण्याची उर्मी आली. मराठी, इंग्रजी व कोंकणीतून नाना विषयांवर विपुल लेखन केले. अजूनही तो यज्ञ चालूच आहे.

अनेकजण विचारतात : ''ही सतत लिहिण्याची ऊर्जा कशी मिळते?'' वाचत असताना, मनन, चिंतन व विश्लेषण सतत चालूच असतं. अनेक विचार कळ्या सापडत गेल्या. त्यातूनच उमललेली शब्दफुले म्हणजेच माझी पुस्तकं. म्हणूनच या पुस्तकाचं नाव 'झाली फुले कळ्यांची'. आतापर्यंत शंभराच्यावर पुस्तके प्रकाशित झाली अजून आणखीन २७ पुस्तके प्रकाशनाच्या वाटेवर आहेत.

'साहित्यमग्न' प्रकाशित झाल्यावर अनेक वाचक, प्रकाशक, मित्र, नातेवाईक, हितचिंतक यांची प्रेमळ तक्रार आली. ''मी पण लिहिलं असतं, तुमच्याविषयी. का नाही सांगितलं?'' इ. दबाव वाढत गेला व त्याचेच फलित म्हणजे हे पुस्तक.

माझा 'कृतार्थ मी, कृतज्ञ मी' (साहित्यमग्न) हा लेख वाचून अनेक वाचक हेलावले. माझी निरवानिरवीची भाषा त्यांना बैचेन करून गेली. त्यांच्याच आग्रहावरून हा लेख पुनःप्रकाशित केला आहे.

वाचकांनी उदंड प्रेम दिले. तो लोभ, ती माया अशीच राहू दे, हीच प्रार्थना.

आपला अभिप्राय जरूर कळवा.

विठ्ठलराय भट
आंबटकर कपौंड,
आंबीवली (पश्चिम), पो. मोहोने
जि. ठाणे ४२११०२,
मो. ९२२३३६५१९९, ९२२१३०९७५८

# लेखानुक्रम

***

# १. सुगंधी सूर्यफूल

– ल.सि. जाधव

माझं 'होरपळ' हे आत्मकथन वाचून आवडलं, म्हणून सांगण्याकरता श्री. विठ्ठलराय भट यांनी फोन केला होता. माझ्या या पुस्तकाबद्दल अभिप्रायाचे मला बरेच फोन यायचे पण विठ्ठलराय भटांचा फोन सर्वस्वी वेगळा होता. मला त्यांच्या बोलण्यातली जवळीकता, आत्मीयता अधिक भावली. तसा त्यांचा माझा आधी कसलाही परिचय नव्हता, पण हा भला माणूस तरीही माझ्याशी घनिष्ट-मैत्रीवत बोलत होता. मग हा संपर्क वाढतच गेला. अधूनमधून आम्ही एकमेकांच्या प्रकृतीचे, लेखना-वाचनासंबंधीचे हालअहवाल जाणून घेत गेलो.

विठ्ठलराय तेवढ्यावरच थांबले नाहीत तर त्यांनी मग धारवाडला अमुकांना पुस्तक पाठवा. गोवा, नागपूर, डोंबिवली, आंबीवली, महाबळेश्वर, नगर अशा ठिकाणच्या कितीतरी रसिक वाचकप्रेमी व साहित्यिकांना पुस्तके पाठवा म्हणून आग्रहच धरायचे. त्यांचं तसं बरोबर होतं. आपण लिहितो, ते छापलं जातं, प्रकाशित होतं आणि जरूर तिथं वितरितही होतं. पण विठ्ठलराय भटांच्या मते ज्यांना ज्यांना अशी पुस्तके पोहोचायला हवीत त्यांच्याकडे ती गेलीच नाहीत तर पुस्तकाचं महत्त्व, मोल कळणार कसं? अशा पाठवणीमुळं वाचनसंस्कृतीच्या विस्ताराचं मोठं कामही होतं आणि लेखक-लेखक, लेखक-वाचक यांचा संपर्कही राहतो, वाढतो.

विठ्ठलराय भट हे स्वतः एक प्रतिथयश व मातब्बर लेखक आहेत. वयाची ऐंशी ओलांडूनही त्यांनी तितक्याच उत्साहाने किंबहुना अधिक कार्यक्षमतेने लेखन करून स्वतःच्या पुस्तकांचीही शंभरी ओलांडली आहे. हे सोपे, सहज काम नव्हे. विठ्ठलरायांनी पुस्तकांच्या वलयात व त्या लेखनाकृतीच्या अद्‌भुत जगतात सातत्याने आपले आयुष्य रमविले आहे. हे असे निर्धारपूर्वक जगणे

किती सुंदर आहे. याशिवाय त्यांनी आपण कसं जगतो, आपल्या या जीवनप्रवासात आपण आपल्याबरोबर किती जणांना प्रेमानं, आस्थेनं घेऊन जातो हेही तितकंच महत्त्वाचं मानलं आहे, ही जाणीव त्यांनी मनोमन जपली आहे. त्यांनी असंख्य मित्र जोडले. त्याला कसलं वयाचं बंधन ठेवलं नाही. कित्येकांच्या प्रत्यक्ष गाठीभेठीही नाहीत. मैत्रीचा सूर्य जसा वळत राहील तसं हे सूर्यफूल सूर्याभिमुख राहतं. हे केवळ तेवढ्यावरच थांबत नाही,तर ते विठ्ठलरूपी सूर्यफूल सारा आसमंत, परिसर सुगंधित करतं. सूर्यफूल हे तसं सुगंधित नसतं पण विठ्ठलरायांचं मन अखंडित सुगंध पसरवीत राहते. असं हे आगळं सुगंधी सूर्यफूल आहे.

विठ्ठलराय भटांच्या प्रेमी-मित्रवर्यांनी त्यांच्या गौरवाप्रीत्यर्थ लेखांचं एक पुस्तकही प्रकाशित केलं. त्यात मला समाविष्ट होता आलं नाही. मलाच चुकल्याचुकल्यासारखं वाटलं. मीच त्यांना फोन करून खंत कळविली. 'बघू, संधी देईन' म्हणाले आणि मला मग बरे वाटले. विठ्ठलरायासारख्या ऋषितुल्य मुनिवराबद्दल आपल्याला त्यांच्यावरील आदरभाव व्यक्त करण्याची या लेखाद्वारे संधी मिळतेय याचा आनंदच झाला.

विठ्ठलरायांची मैत्री निखळ आहे. ते स्वतः मुळातच प्रसिद्धीपराङमुख आहेत. त्यांनी कुठल्याही कंपूवर्गाचा कधीच संसर्ग होऊ दिला नाही. रसिक, चोखंदळ-जाणकार, चिकित्सक अशा वाचनप्रेमींना एकत्र आणून त्यांनी सहप्रवासाचा एक नवा 'कारवाँ'च उभा केला आणि तो आता नव्याजुन्या अनेकांना त्यात सामावून घेत विशाल नदीप्रमाणे समृद्ध होत पुढेपुढे जात आहे. ही साहित्यप्रेमींची एक स्नेहगंगाच आहे. इथं कसला आपपर भाव नाही. श्रेष्ठत्वाचा अहंकार वा कनिष्ठत्वाचा न्यूनगंड नाही. आम्ही सगळे साहित्याचे उपासक आणि निखळ अशा साहित्यानंदाचे तृषार्त प्रेमी आहोत. हा सगळा अशा वाचनप्रेमी व साहित्यिकांचा स्वतःचं वेगळेपण जपणारा जथ्था विठ्ठलरायांच्या अश्वत्थ-वृक्षाखाली सुखद छायेत जमला आहे.

आज सर्वत्र प्रचंड बदल होत आहे. जग खूप जवळ येत आहे पण माणसं मात्र माणसापासून दूरदूर चाललेली आहेत. पूर्वीची पत्रं, पत्रातील मजकूर,

ता.क., ती पत्राची आतुरता, तो पोस्टमनदादा, त्याची ती हुरहुर करायला लावणारी व दीर्घ वाटणारी प्रतीक्षा हे आता सारं-सारं संपलं आहे. आताच्या नव्या सोईसुविधांनी आपण कुणासही, कुठेही सहज क्षणार्धात संपर्क साधू शकतो. पण तरीही आपण या नव्या तंत्रानं निर्विकार का झालो ? आतुरता, ओढ, जिव्हाळा कुठे उडून गेला ? आपण आपले मोबाईल स्वीच ऑफ का करतो? अनेकदा सायलेंटवर का ते ठेवतो? नुसते कोरडे मेसेज का पाठवितो, केवळ शिष्टाचार पाळायचे म्हणून. हे आता नाही रोखता येणार. अशा स्थितीत म्हणून विठ्ठलरायांची संपर्करीत मोलाची वाटते. यामुळं आपण आणखी जवळ येऊ. मित्रांची मांदियाळीच जमेल. मैत्र जीवाचे बनतील.

अन्यथा 'वसुधैव कुटुंबकम्' हे केवळ सुभाषितच उरेल. म्हणून विठ्ठलरायांनी आपल्या अनेक पुस्तकांत असाच विचार मांडला आहे. साहित्य, कला, संस्कृतीशिवाय आयुष्य बेचव होईल. जगणं निरर्थक होईल. शरीराच्या जठराची भूक भागवावीच लागते पण मनाचं काय? त्याची भूक साहित्य, कलाच परिपूर्ण करते. म्हणून पोटात घासभर अन्न आवश्यक असलं तरी, कुणासाठी तरी आपल्या हातात एक तरी फूल असायलाच हवं. विठ्ठलरायांच्या मैत्रीतून मला हेच तर जाणवलं.

मोर किती मोहक, सुंदर असतो. तसाच आपल्या या आयुष्याचाही 'मोर नाचरा हवा' किती मौज वाटेल! हेही विठ्ठलराय भटच आपल्या पुस्तकातून, विचारातून मांडतात.

***

श्री. ल.सि. जाधव : १) होरपळ (आत्मकथन) – महाराष्ट्र राज्य पुरस्कार १२, २) पराभूत धर्म (कादंबरी) ३) सुंभ आणि पीळ (कादंबरी) ४) मावळतीची उन्हे (कादंबरी)

संपर्क : सोलापूर (मो. ९४२३८५८६९८)

# 2. A Guide and a Friend

V. S. Saxena

Almost five years ago, on a very fine evening, it was my good fortune to attend a house warming ceremony. The host was my friend and old colleague, Sharad Borkar. There was a big gathering on the lawns of his new house. The house was tastefully decorated with flowers and coloured lamps and the whole atmosphere was filled with soothing, soft music. The family of the host was engaged in receiving the guests and entertaining them. Almost all the guests knew each other intimately. Naturally, the whole atmosphere was like a family get-together. It was a jubilant occasion. Sharad and his wife first took me to show around their house. It is well designed, self contained, cosy and with a unique layout. Then I was offered sumptuous snacks and later introduced to their relatives, who had come from different places.

Amongst them, I was fortunate to meet a person having a grand personality, with expressions of a matured literary luminary. He was introduced to me by Sharad as his brother-in-law, Shri Vithalray Bhat. When Vithalji presented me with his visiting card and I saw it, I was astonished to find him exactly as per my guess about him. In the card it was mentioned, 'Author and Publisher'. This was at that time when I was writing my book on Indian Philosophy and was in search of a Publisher for my book.

I asked him, if he can publish my book. He told me that he is currently not in that business, but in the past he was engaged in

a similar type of work during his official assignment when he worked for Indo- American Chember of Commerce for about two decades. Since the occasion was not appropriate to discuss such subject in detail, we decided to meet again later. I enquired about his programme, and decided to meet after two days in his abode at Kadwad village.

At the appointed time, Sharad took me to Shri Vithalray's residence. I had taken with me the manuscript of my book, which had by then only few chapters. It was just to give him a flavor of my proposed book and to seek his advice for future course on the basis of his vast experience as an author of many books. I left the manuscript with him for a few days so that he can go through it at his leisure. In our next meeting, he appreciated the theme of my book and its uniqueness and advised me to keep showing him my manuscript as it progresses, for his comments, which I continued to receive from time to time during his visits to Karwar. When my manuscript was almost ready, he advised me how to approach the publishers and showcase it appropriately for getting the book printed. I am indebted to him for his valuable advice and guidance that I received from him.

When my book, 'View of life - the Sanatana Way' was published and ready, Vithalji and some friends suggested that I should release it in a befitting manner. All through my career I had successfully organised various types of events but had absolutely no experience of a book release function. Vithalji had released dozens of his books earlier and therefore explained to me step by step as to how I should plan the activities for this event of mine. With his guidance, the book release function went very well although due to ill health he could not attend this function and was greatly missed.

Vithalji often comes to Karwar from Mumbai and it has been a real pleasure to interact with each time he makes a visit to my

home. It has always been very encouraging to talk to him and getting valuable tips from him on writing and publishing the books. I often saw him talking to youngsters, inspiring them and encouraging them to write articles or essays in prose or poetry for some magazines, periodicals, newspapers or school/ college bulletins. He has developed and guided many young writers.

We all know that he has authored about a hundred books in Konkani, Marathi and English and all of them have been well appreciated by the readers. I am sure; he may have realized that this species of book readers is fast dwindling. These days, the children have no time and liking for reading voluminous books; therefore he has introduced booklets such as short biographies of freedom fighters, musicians of India, Bharat Ratnas and outstanding Indians etc. These booklets are very simple to read and are also economically priced, therefore very popular with the children. He has a good sense of humor, which is reflected in his works. He has coined many new words and has used them effectively to dramatize the plots that he narrates in his books.

Vithalji is a praiseworthy gentleman, a literary luminary to the core. He is a very lovable person and provides a pleasant and friendly company. His contribution to the literary field and in turn to the society is immense. I pray to God to give him a very long, peaceful and enjoyable life.

✻✻✻

Shri. V.S. Saxena, an eminent technocrat and administrator, graduated in chemical engineering from Banaras Hindu University. Being a meritorious student, he secured 2nd rank in the University. After a career spanning nearly four decades in chemical industries in Bihar and Karnataka, he retired as Chief General Manager and Technical Director of Ballarpur Industries Ltd, Karwar.

Having a keen interest in Indian philosophy, he is a researcher of Hindu theology. He renders discourses at Ashrams and religious gatherings and has conducted courses and workshops on spiritual and personality development at industrial and educational institutions.

He has authored a book : 'View of life The Sanatana Way' (Published in 2013).

Contact: Mobile: 09845074813, Tel: 08382-282378, Shirwad, Karwar.



# ३. कर्मयोगी साहित्यिक

दिलीप मालवणकर

दर्द कैसा भी हो । आँखें नम ना करो।
रात काली सही । कोई गम न करो ।।
एक सितारा बनो जगमगाते रहो ।
जिंदगी में सदा मुस्कुराते रहो ।।

विठ्ठलराय भट यांचा व माझा परिचय तसा अकस्मातच झाला. माझ्या आगामी लेखसंग्रहासाठी मुद्रितशोधनाचे काम करणाऱ्या तज्ज्ञ व्यक्तीच्या मी शोधात होतो. माझे एक सहकारी व साहित्यिक श्री. प्रशांत असलेकर यांनी मला विठ्ठलराय भट यांचे नाव सुचविले. त्यामुळे माझा विठ्ठलराय भट यांच्याशी स्नेह जुळला.

मूळचे कडवाडचे (कारवारचे) असलेले व नोकरीनिमित्त मुंबई व नंतर ठाणे जिल्ह्यातील आंबिवली येथे स्थायिक झालेले विठ्ठलराय भट हे एक ज्येष्ठ साहित्यिक आहेत. त्यांची आजवर १०३ पुस्तकं प्रकाशित झाली आहेत, हे ऐकून आश्चर्य वाटलेच परंतु इतका मोठा साहित्यिक प्रसिद्धीपासून, मान-सन्मानापासून वंचित राहिल्याबद्दल खंत वाटली. त्यांचा वाचक वर्ग मुंबई, पुणे, विदर्भ, कारवार, गोव्यापर्यंत मोठ्या संख्येने आहे. असंख्य वाचक त्यांच्याशी प्रत्यक्ष, पत्रव्यवहार व दूरध्वनीद्वारे संपर्कातही आहेत. २००५ च्या महापुरात त्यांचे घर व ग्रंथसंपदा वाहून गेल्यावर याच वाचकांनी त्यांना भरघोस सहकार्य केले, याचा ते अभिमानाने उल्लेख करतात.

लेखन हा छंद म्हणून जोपासत असतानाच त्यांनी आत्मानंदासाठी विपुल

लेखन केले व ते पुस्तक रूपाने प्रकाशित करून हा आनंद मुक्त हस्ते रसिकांत वाटला. शतकाच्या जवळपास ग्रंथसंपदा नावावर असूनही अतिशय विनम्रपणे ते स्वतःला 'सरस्वतीचे उपासक' म्हणवतात. विठ्ठलराय भट यांचे व्यक्तिमत्त्व 'अलौकिक' असे आहे. त्यांनी मराठी, इंग्रजी व कोंकणी भाषेतून साहित्य निर्मिती केली आहे. त्यांनी जे लेखन केले आहे ते एकांगी, एकसूरी नसून विविधांगी, अनेक विषयांना स्पर्श करणारे 'चतुरस्त्र' लेखन आहे. 'दूरदेशीचे नामवंत' या पुस्तकात त्यांनी मार्क ट्वेन, क्लिओपात्रा, मेरिलिन मन्रो, हुएनत्संग, हेलन केलर व आल्बर्ट आईनस्टाईन या आंतरराष्ट्रीय व्यक्तिमत्त्वांचा जीवनपट उलगडून दाखवला आहे. 'नादब्रह्माचे मानकरी' या पुस्तकात त्यांनी पंडित भीमसेन जोशी, बिस्मिल्ला खान, कुमार गंधर्व, झुबिन मेहता, लता मंगेशकर, पंडित रविशंकर, किशोरी अमोणकर, हरिप्रसाद चौरसिया या संगीत क्षेत्रातील दिग्गजांची ओळख करून दिली आहे.

याशिवाय '१५ भारतीय रत्ने, चेराबंडा राजू, भारतीय नवरत्ने, डॉ.बाबासाहेब आंबेडकर, भारतमातेचे निवडक सुपुत्र, भारतरत्न मानकरी, सोनिया गांधी, डॉ. अमर्त्य सेन, युगपुरुष पंचक, दूरदेशीचे जीवलग, मर्दानी झांशीवाली, अहित्याबाई होळकर, नेताजी' यासारख्या चरित्रात्मक पुस्तिका लिहिल्या आहेत. 'क्रांतिवीर भगतसिंग' या चरित्रात्मक ग्रंथात ते भगतसिंग यांचे भारतीय स्वातंत्र्य युद्धातील योगदान, ते विद्रोह सशस्त्र क्रांतीचे मूर्तिमंत प्रतीक कसे होते? हे विस्ताराने सांगून युवकांना प्रेरणा देतात. तर 'मोर नाचरा हवा' या संग्रहात जीवन जगण्याची कला, मनोरंजक माहिती, अनुभव, ज्ञानाचे महत्त्व, संस्कृती इत्यादी विषयांचा मयुरपंखी लोभसवाणा असा संग्रह वाचकांना सादर करतात. 'जांबावली ते आंबिवली', 'नोकरनामा' व 'साहित्यमग्न' हे आत्मचरित्रात्मक ग्रंथाचे तीन खंड आहेत. त्यातून त्यांचा खडतर जीवन प्रवास, उभी ठाकलेली आव्हाने, संघर्षमय जीवन, साहित्यिक, समाजसेवक व राजकीय कार्यकर्ता याचबरोबर कौटुंबिक ऋणानुबंध जपणारा कुटुंबवत्सल प्रमुख यांचे मनोज्ञ दर्शन होते.

विठ्ठलराय भट हे 'कडवाड'चे आहेत याचा उल्लेख त्यांच्या प्रत्येक पुस्तकात आढळतो. आपल्या जन्मभूमीबद्दल प्रत्येकालाच रास्त अभिमान असतो. विठ्ठलराय भट यांचे जन्मभूमीवर निस्सिम प्रेम आहे आणि जन्मभूमीची ओढही आहे, हे पदोपदी जाणवते. 'जननी जन्मभूमीश्च, स्वर्गादीप गरियसि' असे वचन आहे; परंतु विठ्ठलराय भट ते प्रत्यक्षात जगत आहेत, ते दिसून येते. या जन्मभूमीच्या प्रेमातूनच 'कारवार' या संदर्भ ग्रंथाचा जन्म झाला असावा. कारवारच्या लोककला, लोकगीतं, चालीरीती, भौगोलिक ऐतिहासिक महत्त्व, प्रेक्षणीय स्थळं आदींचे तपशिलवार वर्णन आहे. हा एक 'ऐतिहासिक दस्तऐवज' ठरावा असा ग्रंथ आहे. कथा व चरित्रातील व्यक्तिचित्रे जिवंतपणे साकार करण्याची हातोटी त्यांच्या लेखनात आहे. त्यांनी चरित्र, विनोद, ललित लेख संग्रह, तत्त्वज्ञान, आत्मचरित्र, असे विविधतेने नटलेलं सर्वांगसुंदर असे लेखन केले आहे. तसेच कोकणी भाषेतूनही लेखन केलेले आहे. साहित्यिक म्हणून विठ्ठलराय भट यांचे कार्य किती व्यापक व महान आहे, याचा प्रत्यय त्यातून येतो.

त्यांच्या जीवनात घडलेल्या तीन दुर्दैवी घटनांचा येथे प्रामुख्याने उल्लेख करणे क्रमप्राप्त आहे. पोस्टखात्यातील नोकरीत असताना ते जंगलातून येत होते. त्यावेळी त्यांच्या समोर एक पट्टेरी वाघ उभा ठाकला. त्यावेळी त्यांनी एका ट्रकचा आसरा घेऊन आपले प्राण तर वाचवले; परंतु या घटनेमुळे त्यांना रात्री भयंकर ताप येऊन त्यांचे हात-पाय,शरीर लुळे पडले. अनेक उपचाराअंती त्यावर मात केली; परंतु पायात अपंगत्व आले ते कायमचे. दुसरी चटका लावणारी घटना २००५ च्या अतिवृष्टीची. मुंजीच्या कार्यक्रमासाठी ते गावी गेले असता आंबिवली येथील घरातील 'नोकरनामा'ची हस्तलिखिते, छायाचित्रे, आगामी लेखनासाठी संग्रहित केलेली कात्रणं व प्रचंड ग्रंथसंपदा, अतिवृष्टीने घरात पाणी शिरल्याने नष्ट झाली. ग्रंथावर प्रेम करणाऱ्या विठ्ठलराय यांची त्यावेळी काय अवस्था झाली असेल, किती मोठा मानसिक धक्का बसला असेल, याची कल्पनाच करवत नाही. या 'अस्मानी-सुलतानी' संकटावर देखील त्यांनी मात

करून 'नोकरनामा' पुन्हा लिहून काढला! यालाच म्हणतात 'दुर्दम्य इच्छाशक्ती.' तिसरी घटना म्हणजे वृद्धापकाळी ज्यावेळी जीवनसाथीची, अर्धांगीनीची अत्यंत आवश्यकता असते, त्याचवेळी व विशेषतः अपंगत्वामुळे आधाराची नितांत गरज असताना त्यांच्या पत्नीचे दीर्घ आजारामुळे झालेले निधन. जणू काही दैवाने त्यांच्यावर संकटांचा वर्षावच केला. म्हणूनच इतक्या प्रतिकूल परिस्थितीवर मात करून आपले असिधाराव्रत सुरू ठेवणारे विठ्ठलराय भट मला 'अलौकिक' वाटतात. त्यांनी ६ भाषेतील हजारो पुस्तके वाचली आहेत. त्यांनी महापालिकेच्या निवडणुकीत नशीब अजमावून पाहिले, परंतु त्यांना त्यात अपयश आले. त्यांना १९९६ मध्ये अमेरिकन बायोग्राफिकल इन्स्टिटयुटतर्फे *"Man of the year 1996"* हा पुरस्कार प्रदान करण्यात आला. विठ्ठलराय भट हे कर्नाटकाचे महाराष्ट्रातील 'सांस्कृतिक राजदूत' आहेत, असे अभिमानाने कर्नाटकात म्हटले जाते.

त्यांच्या वैय्यक्तिक जीवनाचे 'विदारक दर्शन' त्यांच्या आत्मचरित्रांतून त्यांनी सविस्तरपणे घडवले आहे. आपल्या वाट्याला आलेले दुःख, व्यंग यांचा त्यांनी बाऊ केला नाही. नैसर्गिक अवकृपा होऊनही ते गर्भगळीत झाले नाही. संकटांवर संघर्षाने मात केली. आपल्या दुर्भाग्याचा त्यांनी विधायक कामासाठी उपयोग केला व स्वतःबरोबरच सामान्यज्ञानात भर टाकली. एका शापित जीवनाचे त्यांनी सोनं केलं. समाजापुढे, युवकांपुढे एक आदर्श निर्माण करून लौकिक अर्थाने ते समाधानी व समृद्ध जीवन जगत आहेत. त्यांच्या हातून अविरतपणे साहित्य सेवा घडो, पुस्तकांची शतकोत्तर वाटचाल सुरू राहो व परमेश्वर त्यांना व्याधीमुक्त करुन उर्वरित आयुष्य निर्धाराने जगण्याचे बळ देवो! हीच त्यांचे चाहता म्हणून मनस्वी, हृदयपूर्वक ईश्वरचरणी प्रार्थना !

***



श्री. दिलीप मालवणकर हे एक ज्येष्ठ पत्रकार व समाजसेवक आहेत. त्यांचे 'कवडसे' प्रातिनिधिक काव्यसंग्रह (१९८०) 'आपलं उल्हासनगर' (२०११) व मालवणी मसाला (२०१४) हे लेखसंग्रह प्रसिद्ध आहेत. दै. नवशक्ती, सामना, सकाळ, लोकसत्ता, सा. मार्मिक मधून त्यांनी विपुल लेखन केले आहे. उल्हास नगरपालिकेत ते दोन वेळा नगरसेवक म्हणून निवडून आले. विरोध पक्ष नेता म्हणूनही त्यांनी उल्लेखनीय कार्य केले. ते अनेक संस्थांशी संबंधित असून त्याद्वारे ते सामाजिक, साहित्यिक उपक्रम राबवित असतात. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या उल्हासनगर शाखेचे ते १५ वर्षापासून कार्याध्यक्ष आहेत. त्यांनी अनेक आंदोलने यशस्वी केली आहेत. सा. अजब लोकशक्ती व दीपावली विशेषांकाचे २५ वर्षे सातत्याने प्रकाशक व संपादक म्हणून त्यांनी पत्रकारिता केली आहे. सुमारे ३२ वर्षे दै. 'नवशक्ती'त त्यांनी पत्रकरिता केली आहे.

मो. ०९८२२९०२४७०



# ४. धडपडी आनी जिद्दी माम

– उषा राणे

२०११ वर्सा अखिल भारतीय कोंकणी परिषदेच्या वतीन सदाशिवगडार जाल्ल्या कोंकणी साहित्य परिषदेच्या निमित्तान विठ्ठलराय भट हांची वळख जाली. आनी मागीर त्या वळखिचे रूपांतर माम ह्या आपुलकीच्या आनी मायेच्या नात्याकडेन केन्ना पावले ते कळलेच ना. कारण ते वेळच्यान विठ्ठलमाम आनी हांव केन्ना फोनार तर केन्ना केन्ना प्रत्यक्ष मेळत रावले. विठ्ठलमामाक जेन्ना पयले पावटी पळयले तेन्ना हाव खरे तर अजापच जाले. कारण दुर्दैवी अपघातान आयिल्ला अपंगत्वाचेर मात करून ते मनीस इतल्या जिद्दीन चिकाटीन स्वतःक सिद्ध करचो दृष्टिकोन दाखयता. खरेच तांच्या ह्या बुद्धीवादी व्यक्तिमत्वाक शतशः सलाम.

विठ्ठलमाम एक बहुआयामी साहित्यिक, समाजसेवक, विचारवंत. समाज प्रबोधक, अनुवादक, ताणी अनेक साहित्य प्रकार केळयलात. उदा. चरित्र, लेखन, विनोद, ललित लेख संग्रह, तत्त्वज्ञान, आत्मचरित्र, साहित्य विषय, संकीर्ण ही मराठी तर पोवळ्या माळ, घाण्याचे बैल (हे कथा संग्रह) गितांजली (कोंकणी गितां) तशेच इंग्लीश माध्यमातल्यान शिकपी विद्यार्थ्यांक मदत जावची म्हण बरयिल्ली जाय ती पुस्तकां तांच्या नावार आसात.

अपंगत्व, गरिबी, शिक्षणाची असुविधा आसतानय जिद्दीन साहित्य मळार उल्लेखनीय कामगिरी केल्ले बद्दल अमेरिकन बायोग्राफिकल इन्स्टिट्यूट तर्फे 'मॅन ऑफ द इयर, १९९६' दिवन तांचो सन्मान केला.

विठ्ठलमाम हे एक साधे सरळ, प्रामाणिक, प्रेमळ, उदार आनी दिलदार व्यक्तिमत्त्व. प्रत्येकाक प्रोत्साहन दिवप, आपले तशेच हेरांचे आपले कडले

साहित्य स्वखर्चान पोस्टान वा हेर माध्यमान वाचकांच्या घरा मेरेन पावोवन हेरांच्याय साहित्याचो प्रसार, प्रचार कन्नड लेखकांक उमेद हाडप हे कार्य हे सातत्यानं करीत आसात. साहित्याचे दालन वृद्धिंगत करचें खातीर मना काळजातल्यान वावुरपी आमच्या मामान तरुण वयार जाल्ल्या ''वाग'' अपघातानं आयिल्ल्या अपंगत्वाक धैर्यान तोंड दीत जगचो संघर्ष केलो, आनी तो करतना ताका अक्षरांनी साथ दिली म्हणूक हरकत ना. अक्षरान साथ दिली म्हणचे परस ताणी अक्षराक लागी केले म्हणप योग्य जातलें कारण ल्हानपणा-पासून पुस्तकांच्या सानिध्यांत रावपी बापोल्याचो ताका मेळिल्लो सांगात हाका लागून ल्हानपणा धन्न पुस्तकाची मैत्री, वाचनाची आवड. नवे नवे वाचप, नवे नवे बरोवप, आनी तेवुय सातत्यान बरवप. इतलेच न्ही तर अनेक भाशांतल्यान बरोवर ही ताची हातोटी.

तांच्या 'नालंदा व तक्षशिला' आनी 'दूरदेशीचे नामवंत' ह्या पुस्तकांचे तर 'ब्रेल' लिपितय भाशांतर जावन तांचे साहित्य कुड्ड्या मेरेनय पावला.

मामांचो जल्म सारस्वत ब्राह्मण कुटुंबात जालो, त्याच कुटुंबात ते ल्हानाचे व्हड जाले. कुडेताचो संबंध समाजातल्या विविध जाती जमातीच्या लोकांकडेन आयलो. पूण ताणी आपल्या जातीचे व्हडपण दाखयले ना. वा हेरांक केन्ना कमी लेखले ना, सगळ्यामदी मेळून मिसळून रावले. ही तांची व्हडविकाय तोखणाय करपासारखी.

ताणी पयली पोप्युलर इंग्लीश स्कूल चेंडिये हांगा शिक्षक म्हण काम केले. ते एक नावजतेले, शिक्षक म्हण नाव आधी धन दोनय कमयता आशिल्ले, पूण थय चलिल्लो भ्रष्टाचार आनी त्या विरोधात जाल्लो अपमान असह्य जावन ताणी ती नोकरी सोडली. आनी अन्याय आनी भ्रष्टाचार हांचे विरुद्ध लडचो निर्णय घेतलो... हाचे वेल्यान तांच्या त्यागी, न्यायी आनी मानी वृत्तीचे दर्शन घडता.

तांच्या परोपकारी स्वभावाची आनी एक झलक म्हळयार ते साहित्यिकांका उमेद हाडचे खातीर, तांची पुस्तकां हेर भाशांतल्यान येवची म्हण स्वतः कशे झटतात, हाचे एक उदाहरण. गोंयची फामाद लेखिका बाय सुफला रूद्राजी

गायतोंडे हाणी दिल्ले. ते म्हळयार तिजें रांदपाच्या रेसिपिचेर 'रांदची कूड' हे पुस्तक कोंकणीतल्यान प्रसिद्ध जाल्ले. ते सगळ्यांक खूब आवडले. ते जेन्ना मामाच्या मार्फत मुंबय पावले तेन्ना थंयच्या लोकानी ते पुस्तक मराठीतल्यान येवचे अशी मागणी केली. ही गजाल मामान सुफला बायक कळयली, आनी त्या पुस्तकाचे मराठीत अणकार कर म्हण सांगले. पूण सुफला बायक काय कारणाक लागून ते जमले ना. पूण वोगी बसलो तो माम कसलो ? तिचे पुस्तक मराठीत येवूकच जाय. म्हण मामान किते करचे. वर्सभर वाट पळोवन स्वतः ते पुस्तक मराठीत अणकार कन्न अचकीत ते पुस्तक सुफलाबायक कुरियर कन्न धाडून दिले. स्वकश्टान आनी स्वखर्चान. सुफलाबायक आश्चर्याचो धपको दिलो. 'गोवेकारांचे स्वदिश्ट भोजन' या पुस्तकाच्या प्रकाशन सुवाळया वेळार सुफलाबायन हे सगळ्यांक सांगून आपल्या बापोल्या समान मित्राक मना काळजा पसून धन्यवाद दिले. अशे हे साहित्यिकांक ऊर्बा दिवपी माम.

मुळावे आनी माध्यमिक शिक्षण कन्नड माध्यमातल्यान जाल्ले माम आज मराठी, कन्नड, कोंकणी, इंग्लीश आदी भाषेतल्यान बहू आयामी पुस्तकां बरयतात, लेख बरयतात, खयच्याच भाशेत कमी पडनात ही देख आयची तरनाटी पिळगी आनी पालक वर्गान घेवचे सारखी आसा.

म्हज्या पुस्तक भांडारात तर ताणी जायत्या पुस्तकांची भर घाल्या. स्वतःच्याच न्हय तर अनेक मराठी आनी कोंकणी साहित्तिकांची खूब गोड आनी म्हायतीप्रद पुस्तकां जी संग्रहात उरपा सारकी. ताका मेळिल्ले दर एक पुस्तक ते वाचून स्वखर्चान म्हजे पर्यंत पावयतात. इतलेच न्हय हांव साहित्तिकन्ही, एक साहित्य मोगी आमी एक वाचक पूण म्हजे कडच्यानय ताणी विविध विशयार लेख बरोवन घेतले. आनी प्रसिद्ध केले. मामान कितेंय सांगले आनी हांवे ना म्हणले अशे सहसा जायना. मामाचे आनी म्हजे नाते खयच्या रूणानुबंधाचो धागो हे म्हाका कळना, मामा बद्दल माका आदरयुक्त दबदबो. पूण तांचो 'कारवारची गितां' हो कविता संग्रह आमच्या मंडळावतीन हांव उजवाडा हाडूक शकले ना. ही खंत म्हाका पदोपदी जाता. हांव चडशे मामाक फोन करना.

मामाच फोन करता त्या एका मिनिटाच्या फोनान म्हज्या मनात आपलेपणाची आनी आदबीची भावना जिती जाता. आनी मामाच्या आशिर्वादाचो हात म्हज्या माथ्यार आसा हाचो अभिमान दिसता.

माम वयाच्या ८० व्या पावड्या कडेन पावलात. तांची जिद्द, चिकाटी, उमेद पळोवन खरे दिसना, तांच्या चिरतरुण रहस्याचे कारण म्हाका दिसता तांची दिनचर्या, ताणी केल्लो निर्मळ परोपकार, निःस्वार्थी समाजसेवा, मनःपूर्वक केल्ली साहित्यसेवा आनी तातूतल्यान मेळपी अंतरीक समाधान हेच आसूक फाव.

माम म्हळयार उमेदिचो घसघसो, चोखंदळ वाचक. बहूआयामी लेखक. उत्कृष्ट मार्गदर्शक, निःस्वार्थी समाजसेवक, बरे वक्ते, इतिहासप्रेमी. आधुनिक फिलोसफर, संस्कृताय मोगी, उत्तम मार्गदर्शक, हरहुन्नरी राजकारणी या आनी अशा जाय त्या व्यक्तिमत्त्वाची तासां आशिल्ले मनीस.

अशा म्हज्या मामाक निरामय दीर्घायुश्य लाभू, तांच्या हातान अशीच साहित्यसेवा, समाजसेवा घडू. आनी तांच्या जिणेची शताब्दी मनोवपाची सद आमकां मेळू हीच ईश्वर चरणी प्रार्थना.

***

सौ. उषा उल्हास राणे ह्या एम.ए. पदवीधर असून, अ.भा. प्राथमिक शिक्षक संघटनेच्या कार्यकर्ती आहेत. कारवार परिसरातील लोकवेध हे त्यांचं संशोधनात्मक पुस्तक बरेच गाजलं आहे. सदाशिवगड (कारवार) कोंकणी भाषा आणि संस्कृती मंडळ ह्या संस्थेच्या त्या पदाधिकारी आहेत.

संपर्क : ०९४४८९४७१२९ सदाशिवगड (कारवार)



# ५. स्वधर्माशी इमान राखलेला माणूस

–प्रशांत असलेकर

आदरणीय ज्येष्ठ लेखक श्री. विठ्ठलराय भट यांच्या वयाला ८० वर्षे पूर्ण होत आहेत. माझे वय त्यांच्यापेक्षा बरोबर निम्मे आहे. म्हणजेच दुसऱ्या शब्दांत भटसाहेब माझ्यापेक्षा वयाने अनुभवाने दुप्पट आणि कर्तृत्वाने तर अनेकपट मोठे आहेत. अशा परिस्थितीत माझ्यासारख्या लिंबू–टिंबू कनिष्ठ लेखकाने त्यांच्याबद्दल अभिप्राय तरी काय लिहावा, हा मला पडलेला प्रश्न आहे. त्यांच्याबद्दल लिहिण्याची संधी मिळणे ही माझ्यासाठीच एक गौरवाची गोष्ट आहे.

आयुष्याच्या वाटचालीत अनेक वळणं येतात. प्रत्येक वळणावर नव–नवी माणसं भेटतात. काहींशी फक्त व्यावहारिक पातळीवर संबंध येतात तर काहींशी जीवाभावाचे सख्य जुळते. यातले फार कमी बंध दीर्घकाळ टिकतात. आयुष्यात प्रवाहाला ओढच इतकी आहे की हर घडीला नवी वळणे येतात आणि जुने बंध विस्मृतीच्या प्रवाहात वाहून जातात. विठ्ठलराय भट यांच्याशी पहिला संबंध कधी आला ते आता नीटसे स्मरत नाही. काळ्यावर पांढरे करण्याची थोडीशी खोड मलाही आहे. माझा कुठलातरी लेख वाचून आणि प्रयत्नपूर्वक माझा नंबर मिळवून त्यांनी स्वतःहून संपर्क साधला होता एवढे आठवते. मग बोलणे झाले.पत्त्यांची देवाण–घेवाण झाली. त्यांनी त्यांची काही पुस्तके मला पाठवली. मी माझी त्यांना पाठवली. त्यानंतर आमची जी–जी पुस्तके प्रसिद्ध झाली ती आम्ही एकमेकांना पाठवत राहिलो. त्या पुस्तकांमधून आणि बोलण्यातून भटसाहेब थोडे–थोडे कळत गेले.

विठ्ठलराय भट या पदार्थविशेषाबद्दल बोलायचं तर दोन अंगांनी विचार करावा लागेल. एक लेखक म्हणून आणि दुसरी व्यक्ती म्हणून.

लेखक विठ्ठलराय भट यांनी शंभरच्या आसपास पुस्तके लिहिली आहेत. ती सर्वच काही मी वाचलेली नाहीत. पण जी वाचली त्यावरून त्यांच्या बहुआयामी प्रतिभेचा साक्षात्कार घडतो. त्यांनी हाताळलेल्या विषयांची विविधता पाहून थक्क व्हायला होते. नालंदा-तक्षशिला विद्यापीठांपासून देशोदेशींचे कलाकार, शास्त्रज्ञ, छांदिष्ट या सर्वांबद्दल त्यांनी चरित्रपर लेखन केले आहे. अशा प्रकारचे लेखन करायला बराच अभ्यास करावा लागतो. त्यासाठी चिकाटी, निष्ठा, एका जागी ठाण मांडून बसायची वृत्ती लागते. अध्यात्मात त्याला आसनविजय असे म्हणतात. तो त्यांच्यापाशी आहे.

माहितीपर आणि उद्‌बोधक लेखनाव्यतिरिक्त त्यांनी आत्मचरित्रपर लेखनही केले आहे. त्यातून त्यांच्या विजिगिषू वृत्तीचा प्रत्यय येतो. शारिरीक पंगत्वावर मात करून, आपल्या तत्त्वांशी कोणतीही तडजोड न करता जगण्यासाठी त्यांनी केलेल्या संघर्षाची दास्तान उलगडत जाते.

विठ्ठलराय भट यांच्या साऱ्या साहित्यातून कोकणच्या मातीचा गंध येतो. पार्श्वभूमीवर समुद्राची गाज ऐकू येते. फणसाचा-मासळीचा उग्र गंध दरवळतो. माडा-पोफळीची सळसळ ऐकू येते. लेखकांच्या जातकुळीबाबत अपरिहार्यपणे घडणारी ही प्रक्रिया आहे. विंदा-जयवंत दळवी-श्री. ना. पेंडसेंनी तरुणवयात कोकण सोडले. ४२च्या लढ्यात भाग घेण्यासाठी व्यंकटेश माडगूळकरांनी माणदेश सोडला. आनंद यादवांनी मॅट्रीकनंतर कागल सोडले. पी.जीं. वूडहाऊसने इंग्लंड सोडले. पण या साऱ्या लेखकांनी आपापली मायभूमी साहित्यात अमर करून ठेवली. नेमके तेच भटसाहेबांच्या बाबतीतही घडले आहे. त्यांच्या साहित्यातून कोकण रुणझुणत असते. ही परशुरामाची भूमी त्याच्यासारखीच उग्र प्रवृत्तीची. निसर्गाच्या प्रत्येक हाकेला ओ देत भरभरून जगणारी. त्यातून विठ्ठलराय भट तर थेट कारवारचे. जिथे कोकणची सारी वैशिष्ट्ये आणि वर कानडी बाजही येऊन मिळतो. कोकणी-मराठी आणि कानडी अशा संस्कृती त्रिवेणीत त्यांचं बालपण गेलं. त्यांना लाभलेली हा जन्मजात सांस्कृतिक संपन्नता त्यांच्या लेखनातून पानोपानी डोकावत राहते.

त्यांचे लेखन वाचले, त्यांनी नोंदवलेली निरिक्षणे, त्यांच्या पात्रांची स्वभाववैशिष्ठ्ये बघितली की वाटतं हा माणूस आपलं जीवन अतिशय भरभरून जगला आहे. त्याशिवाय जीवनाला भिडायची इतकी शक्ती लाभत नाही. आयुष्यातला प्रत्येक क्षण त्यांनी सत्कारणी लावला आहे.ते आपलं सारं आयुष्य अतिशय तादात्म्यतेने, रसरसून, उत्साहाने जगले आहेत. त्याशिवाय लेखन इतकं कसदार उतरू शकत नाही.

आता प्रश्न असा उभा राहतो की जीवनात मुरण्याची ही वृत्ती, ही ऊर्जा आली कुठून?

इथे विठ्ठलराय भट या व्यक्तीचे वेगळेपण नजरेत भरते.

ज्या वयात झेप घ्यायची त्या वयातच त्यांच्या बाबतीत तो वाघाचा प्रसंग घडला. त्यांनी पायातली शक्ती गमावली. त्यांच्याजागी दुसरा एखादा असता तर जन्मभर नशिबाला बोल लावत खुडत जगला असता. जगाच्या सहानुभूतीचा दावेदार बनला असता. आपल्या आजूबाजूला आपण अशा प्रकारची अनेक माणसं बघतो. शारीरिक व्यंगाचे प्रदर्शन करून भीक मागणारेच नव्हेत तर धडधाकड माणसेही कुठले तरी दुःख कुरवाळत बसलेली दिसतात. कुढत जगताना दिसतात.

या पार्श्वभूमीवर शारीरिक अपंगत्वासह भटसाहेब अतिशय आत्मसन्मानाचे कृतार्थ आयुष्य जगले. भटसाहेब सारे आयुष्य ऑन अवर टर्म्स जगले. तत्त्वनिष्ठा हा आता दुर्गुण झाला आहे. हुजुरेगिरी, कंपूशाही, प्रॅक्टिकल ॲप्रोच या नावाखाली भ्रष्टाचाराकडे कानाडोळा करणे हीच आजची जीवनशैली आहे. तिला प्रतिष्ठा लाभली आहे. तेव्हा भटसाहेबांसारखा माणूस अनेक ठिकाणी नकोसा झाला यात नवल नाही. लेखन असो की जीवन असो दोन्हीकडे त्यांनी स्वधर्माशी इमान राखलेले दिसते.

त्यांनी केवळ एक नोकरदार, कुटुंबप्रमुख म्हणून संसारच केला नाही तर नाना उद्योग केले. लेखन केले. प्रकाशन व्यवसाय केला. भाडेकरूंची संघटना बांधली. कम्युनिस्ट पार्टीच्या तिकिटावर निवडणूक लढवली. धडधाकट माणूस

गाजवणार नाही इतके कर्तृत्व गाजवले.

त्यांच्या भिक्षूक वडिलांनी भले त्यांना आर्थिक समृद्धी दिली नसेल पण संपन्न सांस्कृतिक वारसा दिला. कारवारच्या मातीने त्यांच्यात आयुष्यातला प्रत्येक क्षण समरसून जगण्याची उमेद जागवली. पाच भाषांवर त्यांचे प्रभुत्व आहे. ते बहुभाषाकोविद आहेत. मराठी, कोकणी, इंग्लिशमध्ये त्यांनी लेखनही केले आहे. त्यांचा जनसंपर्क दांडगा आहे. इंग्रजीत ज्याला फॉलोअप म्हणतात तो त्यांचा काटेकोर आहे. कलावंत हा सामान्यतः मूडी समजला जातो. भटसाहेब त्याला अपवाद आहेत. दिलेली वेळ, शब्द पाळण्याबाबत ते काटेकोर आहेत.

एकूण माणसाने कशा प्रकारे जगावे याचा विठ्ठलराय भट यांचे जीवन हा आदर्श आहे. विठ्ठलराय भट यांना दीर्घायुष्य लाभो आणि उत्तरोत्तर त्यांच्याकडून अधिक सकस साहित्य वाचायला मिळो. त्यांच्या पुढील वाटचालीस माझ्या शुभेच्छा !



श्री. प्रशांत असलेकर हे सिद्धहस्त लेखक आहेत. त्यांची अजूनपर्यंत सहा पुस्तके प्रकाशित झाली असून 'व्याध' ही कादंबरी अत्यंत गाजली आहे. आता ती पुन्हा काही महिन्यात पुनर्मुद्रित होत आहे. 'रंगीबेरंगी' (काव्यसंग्रह) व 'अॅगेन्स्ट ऑल ऑडस' (जिद्दीच्या समाजसेवकाचे चरित्र) ही दोन पुस्तके पण लक्षवेधी आहेत.

श्री. असलेकर यांचे विविध दैनिके, नियतकालिके व दिवाळी अंकांतून सातत्याने कसदार लेखन प्रकाशित होत असते. ते चांगले मुलाखतकार पण आहेत.

संपर्क : ०९३२२०४९०८३ अंबरनाथ, जि. ठाणे.

# ६. प्रसन्नचित्त साहित्योपासक

मीरा प्रभूवेर्लेकर

२०११ सालची गोष्ट. माझा मुक्काम त्यावेळी मुंबईला होता. एक दिवस मला एका अनोळखी वाचकाचा फोन आला. महाराष्ट्र टाईम्समध्ये छापून आलेला माझा लेख आवडल्याचं सांगण्यासाठी. वाचकांची मिळणारी दाद हा माझ्यासाठी (माझ्याचसाठी नव्हे तर प्रत्येक लेखकासाठी) हा हृद्य असा अनुभव असतो. त्यांत तो वाचक कारवारी असेल तर मग माझ्यासाठी तो अमृतानुभवच असतो. त्यादिवशी मला अशीच गोड अनुभूती देणारे अन्य कुणी नसून ज्येष्ठ लेखक श्री. विठ्ठलराय भट होते. यांना-त्यांना फोन करून महत्प्रयासाने त्यांनी माझा मोबाईल नंबर मिळवला होता. या खटपटीमागे माझं अभिनंदन करणं हे निमित्त असलं तरी, मला वाटतं, आम्ही दोघंही 'समग्रामी' (कारवारचे) आहोत हे कळल्यावर 'कारवारची कोण ही?' हे एक कुतूहल त्यांच्या मनांत जागृत झालं असावं. कारण काहीही असो, पण महत्त्वाचं हे की, स्वतः लेखनमग्न असतांनाही इतरांच्या लेखनाला दाद देणारा हा 'प्रोत्साहक' लेखक आहे. एवढंच नाही तर फोनवर ओळख झाल्यानंतर त्यांनी लगेच मला गोव्यांच्या पत्त्यावर आपली कितीतरी पुस्तकं भेट म्हणून पाठवून दिली. असे हे 'साहित्य-योगी' भटकाका!

माझं 'रंग उगवतीचे' हे पुस्तक मी त्यांना पाठवून दिलं. ते वाचून त्यांनी त्यातील प्रत्येक लेखाबद्दल म्हणजे तो कसा वाटला, कां आवडला, कोणते शब्द भावले अशी सविस्तरपणे आपली मत-टिपणी नोंदवून, मुखपृष्ठ, छपाई, तांत्रिक बाबी याविषयीही समीक्षक दृष्टीने लिहून कळवलं. स्वतःचा लेखनव्याप बाजूला सारून दुसऱ्यांना विस्तृतपणे ताबडतोब पोंचपावती देण्याचा त्यांचा गुण खरोखरच अनुकरणीय आहे. सवड काढून दुसऱ्यांसाठी एवढा सगळा

खटाटोप करण्यात वेळ घालवणारे लेखक विरळाच! यामागचं कारणही, नवलेखकांना उत्तेजन ऊर्जा देण्याबरोबरच सल्ले-सूचना देऊन त्यांच्या लेखन-निर्मितीत सुधारणा व्हावी ही त्यांच्यामधील उत्स्फूर्त ऊर्मी आणि तळमळ त्यांना स्वस्थ बसूच देणार नाही हेच आहे. त्यांचा आणखी एक गुणविशेष मला आवर्जून सांगावासा वाटतो. आजच्या धकाधकीच्या जीवनात खिशामध्ये वेळेचा अभाव असल्याने माणसं एकमेकांकडे बोलायला सोडाच, बघायलाही तयार नसतात ही वस्तुस्थिती आहे. परंतु भटकाकांना माणसांचं वेड. ते स्वतः फोन करून ओळखी वाढवतात आणि इतर मित्रमंडळींनाही फोननंबर्स देऊन माणसा-माणसांच्या गाठी घालून देण्याची मध्यस्थाची भूमिकाही फार आवडीने आणि आपलेपणाने पार पाडतांना दिसतात. हेच ते निर्व्याज प्रेम. आज जो तो धनसंग्रह करण्याच्या फंदांत तर भटकाका लोकसंग्रह वाढवण्याच्या छंदांत ! त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे हे दोन पैलू (लेखकांना दाद देणे, मित्रपरिवार वाढवणे) मला माझे लेखनगुरू कै. रवींद्र पिंगे यांची हटकून आठवण करून देतात. ज्यांचं मन स्वच्छ, निर्मळ, निःस्वार्थी असतं तेच असं वागू शकतात.

'जांबावली ते आंबीवली' आणि 'नोकरनामा' या त्यांच्या आत्मकथनपर पुस्तकामध्ये त्यांनी जीवनात आलेल्या संकटांशी केलेला संघर्ष वाचल्यावर, हातापायांनी धडधाकट असलेल्यांना लाजवेल असा त्यांच्यामध्ये असलेला खंबीरपणा, धाडस, प्रसंगावधानता यांचे दर्शन घडते. पायांच्या उपचारासाठी कारवारच्या हॉस्पिटलमध्ये ते दाखल असतांना मीरा कामत नावाच्या नर्सने दिलेलं जॉन व्हिस्कार्डी ज्युनिअर यांचं 'Give us the tools' हे आत्मचरित्र वाचून ते फारच प्रभावित झाले. त्यांची प्रेरणा घेऊनच आपला पुढील खडतर प्रवास चालू असल्याचं ते 'नोकरनामा'मध्ये लिहितात. अनेक कठीण प्रसंगांशी झुंज देता देता शरीर थकलं तरी त्यांचं मन शरीरापेक्षां शतपटीने सशक्त, सुदृढ असल्याचं त्यांच्या लिखाणातून जाणवतं. जीवनात घडलेल्या बारीकसारीक घटनांची तपशीलवार केलेली नोंद त्यांच्या तल्लख स्मरणशक्तीचं द्योतक आहे. 'इंडो अमेरिकन चेंबर्स ऑफ कॉमर्स' या मुंबईमधील संस्थेत नोकरी करतांना

प्रामाणिकपणा, जिद्द, चिकाटी, उत्साह आणि आत्मविश्वास या पंचगुणाचं 'विठ्ठलराय भट' नावाचं रसायन काय आहे याचा प्रत्यय कंपनीच्या वरिष्ठांना आल्याने त्यांनी त्यांचं शारीरिक दौर्बल्य दुर्लक्षून त्यांच्यावर महत्त्वाची आणि जोखमीची कामं मोठ्या विश्वासाने सोपवण्यांत जराही मागे-पुढे पाहिले नाही. ही त्यांच्याविषयी विश्वासार्हता किती अभिमानास्पद आहे!

ते गोव्यांत या ना त्या कारणाने दोन-तीन वेळां येऊन गेले. परंतु त्यांची आजवर दृष्टिभेट झालेली नाही. फोनवरून अधूनमधून संवाद साधला जातो. मी प्रत्यक्ष त्यांना भेटलेले नसले तरी त्यांच्या व्यक्तिमत्त्वपैलूंचं दर्शन घडलं ते त्यांच्या लेखनातूनच! ते केव्हांही, कुणालाही मदत करण्यास सदैव तयार असतात. माझंच उदाहरण देते. एकदां फोनवर बोलता-बोलताच माझी काही पुस्तकं खपायची शिल्लक राहिली आहेत असं मी सांगण्याचाच अवकाश की, ती पुस्तकं आपल्याकडे पाठवून द्या, आपण खपवण्याची व्यवस्था करतो असं पटकन सांगूनही ते मोकळे झाले. माझ्यासाठी हे अनपेक्षित होतं. तर असे हे कार्यतत्पर भटकाका!

'जांबावली ते आंबीवली' पर्यंतच्या त्यांच्या खडतर जीवनप्रवासामध्ये अर्थ-कमाईसाठी 'नोकरनामा' सांभाळत असतांनाच 'साहित्यमग्न' राहून त्यांनी आपली अक्षर-साधना अखंड चालू ठेवली. याचंच फलित म्हणून आज त्यांच्या (अक्षर) कळ्यांची झालेल्या फुलांनी त्यांचं जीणंचं सुगंधित करून टाकलंय. 'साहित्य-मग्न' आणि 'झाली फुले कळ्यांची' या दोन पुस्तकांमध्ये त्यांच्या स्नेहांकितांनी त्यांच्याविषयी लिहिलेले भावशब्द हाच त्यांचा गौरव आणि हीच त्याच्या जीवनाची कृतकृत्यता! सहस्रपूर्णचंद्र दर्शन घडलेल्या या प्रसन्नचित साहित्योपासकास उत्तम आरोग्यासहित उदंड आयुष्य लाभो आणि सरस्वतीची अविरत सेवा घडण्यासाठी त्यांनी हाती घेतलेली लेखणी कायम 'अथक' राहो अशी त्यांना मनःपूर्वक शुभेच्छा देते!

***

सौ. मीरा निशीथ प्रभूवेर्लेकर ह्या अर्थशास्त्राच्या पदवीधर असून त्या विविध वृत्तपत्रे व नियकालिके यातून सातत्याने लेखन करतात. त्यांचं 'रंग उगवतीचे' हे (ललित लेखसंग्रह) पुस्तक प्रकाशित झालं असून, पारितोषिक प्राप्त झालेले आहे. त्यांचं दुसरं पुस्तक प्रकाशनाच्या वाटेवर आहे.
संपर्क : ०९४२०२४२३९६ म्हापसा (गोवा)



# ७. लिहित्या हाताचा कार्यकर्ता

सोनाली नवांगुळ

ज्यांना शाहिरीची आवड असेल त्यांना कोल्हापुरातील शाहीरतिलक पिराजीराव सरनाईक हे नाव किमान ऐकून माहिती असेल. शिवाजी पेठेत या पिराजीरावांची एक बेकरी. राहायलाही पेठेतच. एरवी डोक्यावर तपकिरी टोपी, अंगात कोट आणि हातात छत्री अशा वेषात हा माणूस रस्त्यावरून चालत जाताना सामान्य वाटायचा, पण एकदा का शाहिरी फेटा बांधला, अंगात बाराबंदी आणि तुमान चढवली आणि हातात डफ घेतला की भुवया आणि मिशा पांढऱ्याशुभ्र झालेल्या या माणसाच्या अंगात जणू वीज सळसळायला लागायची. कधीकाळी रशियन नेते बुल्गानिन यांनी भारताला भेट दिली तेव्हा पं. नेहरू आणि बुल्गानिन यांच्यासमोर पिराजीराव सरनाईक यांनी मराठमोळ्या शाहिरीचा आवाज आणि डफ घुमवून दाद मिळविली होती, पण उन्हं उतरतीला लागली, संध्याकाळच्या सावल्या जाणवायला लागल्या तेव्हा पिराजीराव म्हणायला लागले, ''आता लागले पैलतीराला माझे तर डोळे, तेल दिव्यातील संपत आले, दिन थोडे उरले...'' – पिराजीराव तोंडाने असं म्हणायचे खरे, पण त्यांच्यातला उत्साह, डफावरची त्यांची थाप ही पूर्वीइतकीच जोमदार आणि मरगळल्या मनांना उमेदीचा स्पर्श देणारी असायची.

विठ्ठलराय भट यांच्याशी माझी भेट झाली तेव्हा त्यांच्याबाबतीतही मला नेमकी हीच गोष्ट जाणवली. वय असेल ऐंशीच्या घरात, पण इंग्रजी, मराठी, कोकणी अशा विविध भाषांत प्रसिद्ध झालेली पुस्तके नव्वदीत आणि आणखी सत्तावीस पुस्तकं प्रसिद्धीच्या मार्गावर असलेली. अफाट वाचन तितकाच अफाट लोकसंग्रह आणि सहज साधी माहितीपूर्ण अशी लेखनशैली. कोणालाही काही मदत हवी आहे असे जाणवले तर उपकाराचा आव न आणता सहजपणे मदतीचा

हात पुढे करण्याची वृत्ती ही विठ्ठलराय भट यांची गुणवैशिष्ट्ये. आता तेही अधूनमधून पैलतीराच्या गोष्टी बोलतात, पण त्यांच्या मनाची उमेद, सतत लिहिते राहाण्याचा उत्साह या गोष्टी सांसर्गिक म्हणाव्यात अशा आहेत.

माझं वय आता ३३-३४ वर्षांचं. वाचन आणि लेखन या गोष्टी माझ्याही आवडत्या. लेखनावर तर माझी उपजीविकाच अवलंबून, पण तरीही सकाळी उठून, सगळं आवरून कामाच्या टेबलवर यायला मला नऊ वाजतात. याउलट विठ्ठलराय भट यांची दिनचर्या समजून घेण्याचा प्रयत्न केला तेव्हा धक्काच बसला. खरंतर निवृत्तीनंतर आता सकाळी उठून कुठे धावत-पळत जाण्याचा प्रश्न नाही, पण विठ्ठलराय भट सकाळी चारच्या ठोक्याला उठतात. प्रातर्विधी उरकून चहा घेतला की लेखनासाठी बैठक जमवतात. सातच्या सुमाराला वर्तमानपत्रं आली की तासभर वर्तमानपत्रांचं वाचन. वृत्तपत्रात आपल्याशी संबंधित कुणा व्यक्तीबद्दल काही छापून आलं असेल तर संबंधित व्यक्तीला फोन. त्यानंतर पुन्हा लेखनाची बैठक जमवली की ती दुपारी दीडपर्यंत. संध्याकाळ मात्र मुख्यतः वाचनासाठी राखून ठेवलेली आणि काहीही झालं तरी रात्री झोपण्याची वेळ मात्र साडेनऊ ही पक्की.

प्रत्येक नव्या दिवशी काय लिहायचं असा प्रश्न जसा विठ्ठलरायांना पडत नाही त्याचप्रमाणं रोज काय वाचायचं असा प्रश्नही त्यांना पडत नाही. मुळात मराठी, हिंदी, संस्कृत, इंग्रजी, कन्नड आणि कोकणी इतक्या भाषांवर प्रभुत्व असल्यामुळं वाचनात वैविध्य खूप. वय लक्षात घेता ना.सी.फडके, वि.स.खांडेकर आणि नंतर पु.ल. देशपांडे, कुसुमाग्रज, जी.ए. कुलकर्णी अशा लेखकांचं साहित्य विठ्ठलराय भटांच्या नजरेखालून गेलेलं असणं आणि त्यांना ते आवडणं हे साहजिक, पण विठ्ठलराय साहित्याच्या प्रवाहातील त्या टप्प्यावर थबकून राहिलेले नाहीत. त्यांनी जसे खांडेकर किंवा पुल आवडीनं वाचले तितक्याच आवडीनं आजच्या लेखिका मानल्या जाणाऱ्या कविता महाजन यांचं 'ब्र' किंवा 'भिन्न' वाचलेलं आहे. त्यांना लक्ष्मण गायकवाड व सदानंद देशमुख हे लेखकही माहिती आहेत. मध्यंतरीच्या काळात त्यांनी भालचंद्र नेमाडेंचं साहित्यही वाचलंय व ते लोकांपर्यंत पोहोचवण्याचा

प्रयत्न केलाय. या माणसाच्या वाचनाचा आवाका असा अफाट. कोकणीत महाबळेश्वर सैल व कन्नडमध्ये भैरप्पा यांचे साहित्य तसेच इंग्रजीत फ्रेडरिक फोर्सिथ यांच्या कथा व ऑर्थर हॅले यांच्या कादंबऱ्या, हिंदीतील मैथिलीशरण गुप्त यांचं काव्य ही विठ्ठलराय भट यांची साहित्यविश्वातील कायमची म्हणावीत अशी जिव्हाळ्याची ठिकाणं.

स्वतः विठ्ठलराय भट यांनी जसं चरित्रात्मक लेखन केलंय, ललित लेखन केलंय त्याचप्रमाणे संदर्भासाठी त्यांनी जी अशी पुस्तकंही लिहिली आहेत. 'अधात्मवाद-फेरमांडणी' हे त्यांचं पुस्तक तर तत्त्वज्ञानावरती. चरित्रलेखनासाठी त्यांनी जी व्यक्तिमत्त्वं निवडली त्यामध्येही खूप वैविध्य आहे. त्यामध्ये साहित्यिक आहेत, शास्त्रज्ञ आहेत, देशभक्त आहेत, देशी-विदेशी अभिनेत्री आहेत, स्वातंत्र्यसैनिक आहेत, अर्थतज्ज्ञ आहेत, अगदी डॉ. अमर्त्य सेन, जे.एफ. रिबेरो, सोनिया गांधी यांच्यासारख्या व्यक्तिमत्त्वांविषयीही विठ्ठलरायांनी लेखन केलं आहे. इतक्या विभिन्न क्षेत्रातल्या व्यक्तिमत्त्वांच्या अंतरंगांना जाणून घेत त्यांच्याविषयी लिहिणं ही सोपी गोष्ट नाही. विशेष म्हणजे विठ्ठलराय भट जे जे काही लिहितात त्यासाठी संदर्भ म्हणून कशाकशाचा वापर केला याची यादी लेखनासोबत आवर्जून देतात आणि त्यामुळं त्यांच्या लेखनाला एक वेगळं वजन आणि विश्वासार्हता प्राप्त होते. अगदी नालंदा व तक्षशीला या प्राचीन भारतीय विश्वविद्यालयांबाबतची एक पुस्तिका विठ्ठलरायांनी लिहिली तेव्हा तिच्या शेवटीही त्या पुस्तिकेसाठीचे संदर्भ कुणाकुणाकडून उपलब्ध झाले याची यादी त्यांनी दिलेली पाहायला मिळते. माझ्यासाख्या नव्याने साहित्य विश्वात काही करू इच्छिणाऱ्या सर्वांनाच विठ्ठलराय यांची दिनचर्या, त्यांचा व्यासंग, आवश्यक संदर्भ नोंदवण्याची पद्धत यातून खूप काही शिकण्यासारखे आहे.

माणसांचं आयुष्य कुठून सुरू होतं आणि त्याला कुठं घेऊन जातं हे सांगणं तसं अवघड. विठ्ठलराय भट यांचा जन्म काली नदीच्या काठावर वसलेल्या कडवाड म्हणजेच कर्नाटकातील (उत्तर कन्नड) जिल्ह्यातील कारवार या गावात झालेला. घराणं संस्कृत पंडित असलेल्या पुरोहितांचं. विठ्ठलराय यांच्या आजोबांकडे गुरुकुल पद्धतीनं चाळीसएक विद्यार्थी शिकण्यासाठी येत असत.

तोच वारसा नंतर त्यांच्या काकांकडे म्हणजे यशवंत भटांकडे आला. थोरले काका म्हणून यशवंत भटांना भट कुटुंबीय 'होडलो बाप्पा' म्हणत. त्यांच्या घरी संस्कृत, मराठी, कोकणी, हिंदी, कन्नड आणि काही इंग्रजी पुस्तकं आणि वर्तमानपत्रे व मासिकेही असायची. पुस्तकं आणि अक्षर यांच्याशी विठ्ठलराय भटांचं नातं जुळलं ते इथेच. यशवंत भटांकडे अनेक शास्त्री, पंडित येत, काव्यशास्त्रविनोद, वादविवाद-चर्चा चालत. या साऱ्याचा संस्कार विठ्ठलराय भटांच्या मनावर होत राहिला आणि लिहिण्यावाचण्याविषयी एक अतूट बंध निर्माण झाला तो कायमचाच.

घरची परिस्थिती तशी काही उत्तम नव्हती. शाळेला जातानाही रोज चारपाच किलोमीटरची पायपीट करावी लागायची. भ्रष्टाचार, अन्याय सहन करायचा नाही ही कायमची भूमिका त्यामुळे नोकरी लागल्यानंतरही संघर्ष पाचवीला पुजलेला. सुरुवातीच्या काळात अनेक छोट्यामोठ्या नोकऱ्या कराव्या लागल्या. उदाहरणच सांगायचे तर सोळाव्या वर्षी एस.एस.एल.सी. परीक्षा पास झाल्यावर शिक्षणाची दारे गरिबीमुळे बंद झाली आणि विठ्ठलरायांनी वयाच्या अठराव्या वर्षी कुमठा येथे डीके मोटर्स मध्ये नोकरी पत्करली. काही महिने नोकरी केली, पण तेवढ्यात टॉयफॉईडने गाठले. नोकरी सुटली. पुढची नोकरी होती ती एका शाळेत हिंदी विषय शिकवण्याची, पण चुकीच्या गोष्टींना विरोध करण्यानं तीही आठ महिन्यात सुटली. मग पदरी पडली हल्याळ तालुक्यातल्या सांब्राणी या गावात पोस्टमन म्हणून पत्रे पोहोचवण्याची नोकरी. पोस्टमनची नोकरी इमानेइतबारे बजावताना घनदाट जंगलातून जावं लागे. जंगलातून जात असताना एक दिवस अचानकपणे ढाण्या वाघ विठ्ठलरायांना आडवा आला. काही फुटांच्या अंतरावर वाघ आपल्याकडे रोखून पाहत थेट रस्त्यात उभा असल्याचे पाहून पाचावर धारण बसणं साहजिक होतं. थोडावेळ रस्ता अडवून उभा असलेला वाघ मागून आलेल्या एका ट्रकमुळं रस्ता सोडून निघून गेला, पण आजूबाजूला मदतीला कोणीही नसताना थेट वाघाच्या समोर उभे ठाकण्यातून बसलेला मानसिक धक्का इतका होता की विठ्ठलराय भटांना सडकून ताप भरला आणि त्या तापातच त्यांच्या हातापायातील ताकद नाहीशी झाली. खूप प्रयत्नांनी नंतर

हातांमधील ताकद परत मिळाली, पण पाय मात्र अधू राहिले. वाट्याला कायमस्वरूपी अपंगत्व आले, पण या अपंगत्वानं विठ्ठलराय भटांच्या मनावर ना कधी नैराश्याचे मळभ आणले, ना कधी त्यांना कधी आपल्या अपंगत्वाचे भांडवल करावेसे वाटले. ते सहजभावाने आपलं काम करत राहिले. इंडो-अमेरिकन चेंबर ऑफ कॉमर्स मध्ये विठ्ठलराय भट यांचा एक टायपिस्ट कम क्लार्क म्हणून प्रवेश झाला आणि त्यांच्या आयुष्याला काही प्रमाणात स्थैर्य प्राप्त झाले. एकीकडे चेंबरमध्ये काम करत असताना विठ्ठलरायांची लेखन साधना सुरू होती. त्यांनी पुस्तक प्रकाशनाचा उद्योगही करून पाहिला. दुसरीकडे मध्यमवर्गीय, निम्न मध्यमवर्गीय यांच्या प्रश्नांच्या सोडवणुकीत आपल्याला योगदान देता यावं म्हणून ते भारतीय कम्युनिस्ट पक्षाच्या जनसंघटनांसाठीचे क्रियाशील कार्यकर्ते बनले. अनेकांचे संसार या काळात विठ्ठलरायांनी उभे केले. मुंबई महापालिकेची निवडणूकही त्यांनी एकदा लढवली होती. चेंबरमध्ये ते प्रगतीचा सोपान चढत होते, पण त्यातून आलेलं मोठेपण त्यांच्या सामाजिक कामात कधीच आडवं आलं नाही. चेंबरमधला मोठेपणा त्यांनी आपल्या आयुष्यात कधी मिरवलाही नाही. चेंबरमधून त्यांनी निवृत्ती पत्करली तेव्हा त्यांचे पद चेंबरचे सल्लागार असे होते.

खरं सांगायचं तर मी अनुवादित केलेलं 'ड्रीमरनर' सारखं पुस्तक वाचून विठ्ठलरायांनी मला आवर्जून फोन केला तेव्हा त्यांचं हे मोठेपण मला अजिबात माहिती नव्हतं. मग कधीतरी कारवारला जाताना कोल्हापुरात मुद्दाम थांबून ते मला भेटायला आले. प्रत्यक्ष भेटीत त्यांचं व्यक्तिमत्त्व अधिक उलगडत गेलं. लक्षात आलं की खूप मोठा असणारा हा माणूस कोणालाही किती आदरानं वागवतो, कोणत्याची छोट्यामोठ्या कामगिरीतला जो चांगला भाग असेल त्याचं मनापासून कौतुक करतो आणि उमेदीनं पुढची चार पावलं टाकायला पाठबळ देत म्हणतो, ''काम करत राहायचं बघा.. मग सगळं सोपं!''

***

कु. सोनाली नवांगुळ या पदवीधर असून पूर्णवेळ साहित्य,लेखन, वाचनासाठी देतात. त्या स्वतः अपंग असून अनेक अपंग संस्थांत व सामाजिक क्षेत्रात कार्यरत आहेत. काही महिन्यांपूर्वी पुणे येथे भरलेल्या मराठी अपंग साहित्य समेलनाचे अध्यक्षपद भूषविले होते. लेखन, अनुवाद, भाषण असे त्यांचे कार्य सातत्याने चाललेलं असत. अक्षम्य उत्साहाचे झाड म्हणजे सोनाली नवांगुळ.

संपर्क : ०९४२३८०८७१९ कोल्हापूर.

# ८. एक कृतार्थ जीवन

–पां.ना. कुमठा

माझी व विठ्ठलराय भटांची ओळख कधी झाली, कशी झाली ते आता आठवत नाही. माझे वय ९३. त्यामुळे श्रवणशक्तीप्रमाणेच स्मरणशक्तीपण क्षीण झाली आहे.

१९६० साल असावे. भटांनी स्वतःच आपली तीन इंग्रजी पुस्तके प्रकाशित केली होती. The Kaleidoscope, The Bouquet, The Rainbow. त्याच्या काही प्रती घेऊन ते मला बॉम्बे बुक डेपोला भेटले होते. ही त्यांची पहिली आठवण.

भटांचा एकसष्टी समारंभ ठाणे येथील एका हॉलमध्ये साजरा झाला होता. त्यावेळी श्री. दिलीप महाजन (मोरया प्रकाशन) यांनी भटांचे एकविसावे पुस्तक 'भारतीय नवरत्ने' यांचे प्रकाशन आयोजित केले होते. त्या समारंभाला मी हजर होतो. माझे त्यावेळी भाषणपण झाले होते; (अशी) आठवण आहे.

श्री. भट इंडो-अमेरिकन चेंबर ऑफ कॉमर्स येथे नोकरीला होते. त्यांच्या संस्थेमार्फत ताजमहाल हॉटेल किंवा ऑबोराय टॉवर्स हॉटेल येथे साजऱ्या होणाऱ्या काही कार्यक्रमांना ते मला व डोंबिवली येथील त्यांचे मित्र श्री. शरद जोशी (ग्रंथ प्रसारक) यांना आवर्जून बोलवत असत. त्यामुळे मैत्री अधिक घट्ट झाली.

पुढे भट एकामागून एक अशी पुस्तके लिहित गेले व त्यांच्या प्रती बॉम्बे डेपोत विक्रीसाठी द्यायला लागले. त्यामुळे आमच्या भेटीगाठी वारंवार घडू लागल्या व मैत्रीचे धागे घट्ट विणले गेले. 'नोकरनामा' व 'जांबावली ते आंबीवली' ही त्यांची दोन आत्मचरित्रे त्यांच्या जीवनातील विविध पैलू



सविस्तरपणे विदित करतात. Both books are really great! एवढचं मी म्हणू शकेन.

हल्लीच त्यांच्या सहस्रचंद्रदर्शन वर्षानिमित्त त्यांच्या काही चाहत्यांनी (२८ जणांनी) 'साहित्यमग्न' हा अभिनंदनपर ग्रंथ प्रकाशित केला आहे. त्यातील 'पुष्पा तावडे' यांच्या लेखामुळे मला श्री. भट यांच्या सामाजिक कार्याची सविस्तर माहिती समजली. जी मला त्या अगोदर जरा पण माहीत नव्हती.

विठ्ठलरायांनी फक्त लेखन केले असे नाही. प्रकाशन व विक्री क्षेत्रातही त्यांनी अनुभव घेतला. नवोदितांना सातत्याने मार्गदर्शन करून, उत्साह वाढवून त्यांना लिहिते करतात. त्यांचा जनसंपर्क दांडगा आहे. ते कृतार्थ जीवन जगत आले आहे. आत्तापर्यंत त्यांची १०१ पुस्तके मराठी, कोंकणी व इंग्रजीतून प्रकाशित झाली आहेत. त्याचे पुढील जीवन सुखसमाधानाचे जावो अशी ईश्वराजवळ पार्थना करतो व माझा हा छोटेखानी लेख संपवतो.

***

श्री. पां.ना.कुमठा हे मराठी साहित्य विश्वात 'कुमठाशेठ' या नावाने सर्वज्ञात आहेत. गिरगांव येथील बॉम्बे बुक डेपोंची धुरा त्यांनी अनेक दशके सांभाळली. पुस्तक पंढरी नावाचे मासिक ते चालवीत. त्यांचं पुस्तक 'पंढरीचा वारकरी' हे आत्मचरित्र बरंच गाजलं.

संपर्क : ०९९३०२७५०२५ गांवदेवी (मुंबई)



# ९. अपंगत्वावर मात करणारा धुरंधर

– कृष्णा शेटकर

२०१२ साली माझे पहिले पुस्तक 'डायरी एका नौ सैनिकाची' हे पुस्तक पुण्याचे श्री. राजू भानारकर यांनी प्रकाशित केले. पुस्तक प्रकाशनानंतर एक महिन्यात मला मुंबईहून फोन आला. फोनवरून बोलणारी व्यक्ती सुरुवातीला मला शुभेच्छा व्यक्त करून म्हणाली, ''माझे नाव विठ्ठलराय भट, आपले पुस्तक 'डायरी एका नौ सैनिकाची' वाचण्यात आली. आरमारी जीवनावरील एकही पुस्तक माझ्या वाचण्यात आले नव्हते; पण तुमचे पुस्तक वाचून एका नवीन आगळ्या वेगळ्या आरमारी जगाचे ज्ञान प्राप्त झाले.'' आणखी खूप काही ते फोनवरून माझ्याशी माझ्या पुस्तकाबद्दल बोलत होते. माझी प्रशंसा करीत होते. त्यानंतर तीनचार दिवसांत मुंबईहून त्याचे पत्र आले, त्यात पत्रात सविस्तर त्यांनी आपल्याबद्दल लिहिले होते.

माझ्या दुसऱ्या पुस्तकाचे प्रकाशन श्री. राजू भानारकराने केले तेव्हा पण प्रकाशनानंतर काही दिवसात श्री. विठ्ठलराय भटांचे पत्र आले, त्या पत्रात त्यांनी माझ्या 'एका नौसैनिकाच्या डायरीतून' या पुस्तकाबद्दल प्रशंसा करून मला प्रोत्साहन दिले. ते म्हणाले होते तुमच्या दोन्ही पुस्तकांना गोव्यातील प्रसिद्ध नामवंत अशा साहित्यिकांची प्रस्तावना लाभली आहे. त्यांनीही तुमच्या दोन्ही पुस्तकांची स्तुति केली आहे.

तुमच्या लिखाणातले साधे, सोपे, सुटसुटीत व सहजसुंदर वाटावे अशी वाक्यरचना आणि साध्याही विषयातला मोठा आशय उकलून दाखविण्याची हातोटी फार आवडली असे श्री विठ्ठलराय भटांनी माझ्या बाबतीत लिहिल्यामुळे मला प्रोत्साहन मिळाले व त्यांच्या त्या प्रोत्साहनामुळे मी दर आठवड्याला एक लेख लिहून गोव्यातील विविध वृत्तपत्रात पाठवित गेलो व ते सर्वच लेख

प्रसिद्ध झाल्यावर आतापर्यंत आरमारी जीवनावर तीन पुस्तके लिहू शकलो. हे सर्व साध्य झाले श्री विठ्ठलराय भटांच्या प्रोत्साहनामुळेच.

श्री विठ्ठलराय भटांनी लिहिलेल्या शंभर पुस्तकातील जवळजवळ बहुतेक पुस्तके वाचली आहेत. त्यांची पुस्तके ज्येष्ठांपासून विद्यार्थ्यांपर्यंत प्रबोधनयुक्त अशी आहेत.

शरीराने अपंग. २००३ साली त्यांची पत्नी दिवगंत झाल्यावर काही काळ ते विचलित होते. पण त्यांनी स्वतःला सावरले व अति जोमाने विविध विषयांवर लिहिण्यास सुरुवात केली. 'साहित्यमग्न'या त्यांच्या पुस्तकात त्यांच्याबद्दल अनेक नामवंतांनी त्यांच्या धडपडत्या स्वभावाबद्दल लिहिले आहे. त्यांचे वय ऐंशीवर झाले आहे तरीपण ते अधूनमधून कारवार व गोवा या आपल्या जन्मभूमींना भेट देण्यास विसरत नाहीत.

वाचकांसाठी लिहिले पाहिजे, सौंदर्य वस्तूमध्ये नसून दृष्टीत असते, त्यासाठी लेखकाची दृष्टी सौंदर्य अनुभवणारी असावी लागते. लेखकाचे साहित्य वाचकांच्या कल्पनाशक्तीला वाव व आकार देणारे असावे असे श्री विठ्ठलराय भटांच्या लिखाणातून दिसून येते.

शेवटी, त्यांना दीर्घायुष्य लाभो ही प्रार्थना करून इथेच थांबतो.

***

श्री. कृष्ण म. शेटकर यांची अजूनपर्यंत तीन अत्यंत वाचनीय अशी पुस्तके प्रकाशित झाली असून त्यांचं चौथे पुस्तक प्रकाशनाच्या वाटेवर आहे.

श्री. शेटकर यांना अनेक पुरस्कार लाभले आहेत.

संपर्क : ०९४२३३०७४४९, बारदेस, गोवा.



# १०. भट आजोबा...

–मानसी जोशी

श्री. विठ्ठलराय भट या नावाची माझी पहिली ओळख झाली ती माझ्या आजोबांचे म्हणजे श्री. शरद जोशी यांचे मित्र म्हणून. पण, खरा परिचय झाला तो शाळेच्या उपक्रम वहीत जेव्हा काही मोठ्या व्यक्तींचे चरित्र लिहायचे होते तेव्हा 'भारतीय नवरत्ने' या त्यांच्या पुस्तकातील चरित्रपर लेख मला अगदी ऐन वेळी मदत करणारे ठरले.

नंतर 'नोबल पुरस्कारांचे मानकरी', 'दूर देशीचे नामवंत' या व अशा अनेक पुस्तकांनी शालेय उपक्रमांसाठी तर मोठी शिदोरी दिलीच, पण माझ्या सामान्य ज्ञानाच्या प्रगतीसाठीही त्यांचा खूप आधार वाटला.

मी स्वतः शास्त्रीय संगीत वयाच्या पाचव्या वर्षापासून शिकत आहे. अलीकडेच वाचलेले त्यांचे 'नादब्रह्माचे मानकरी' हे पुस्तक शास्त्रीय संगीतातील महान कलाकारांची किती सुरेख माहिती देणारे आहे!

मी मराठी माध्यमात शिकणारी मुलगी. माझे इंग्रजी चांगले होण्यासाठी त्यांनी लिहिलेली इंग्रजी पुस्तकेही मला वाचायला मिळाली. भारतीय स्वातंत्र्यलढ्यातील नेत्यांवर त्यांनी सोप्या, सुटसुटीत भाषेत लिहिलेली ही इंग्रजी पुस्तके माझ्या मैत्रिणींनाही खूप आवडली. शाळेच्या इंग्रजी पुस्तकाव्यतिरिक्त इंग्रजी वाचन माझे केवळ याच पुस्तकांचे आहे. पण या पुस्तकांमुळे माझा इंग्रजीबद्दलचा आत्मविश्वास वाढला आहे. त्यामुळे येणाऱ्या मे महिन्यात मी इतर काही इंग्रजी पुस्तके वाचायचे ठरवले आहे, ते याच विश्वासाच्या जोरावर!

माझी भट आजोबांशी प्रत्यक्ष ओळख झालेली नसूनही ते अशा अनेक पुस्तकांमुळे माझ्या ओळखीचे झाले आहेत! अजूनही त्यांनी आमच्या-सारख्यांसाठी खूप खूप पुस्तके लिहावीत हीच माझी मनापासूनची इच्छा...

***

कु. मानसी शेखर जोशी या दहावीत शिकणाऱ्या विद्यार्थीनी. 'गौरव महाराष्ट्राचा' स्पर्धेत त्यांना दुसरा क्रमांक मिळाला होता. कु. मानसी ह्या डोंबिवली (पश्चिम) येथे राहतात.



# ११. सिद्धहस्त लेखक

– श्रीहरी आठल्ये

*नुकत्याच ८० व्या वर्षात पदार्पण करत्या झालेल्या, १०१ पुस्तकांच्या लेखन, प्रकाशनाचं पालकत्व निभावणाऱ्या आणि गोव्याशी जवळचं नातं असणाऱ्या विठ्ठलराय भट यांच्याविषयी...*

''विधिलिखितात लिहिल्याप्रमाणे मिळण्यासाठी भाग्य लागते व ते दहा जणांमधून एकाला प्राप्त होते. 'वन आऊट ऑफ टेन' या विषयावरील माझ्या लेखाला वाचक मंडळींकडून प्रतिसाद मिळाला व मी लिहित गेलो. एकतर माझे लेखक म्हणून भाग्य उजळण्याची वेळ साधली गेली असेल व दुसरे म्हणजे माझ्या हस्तरेषांमधील साहित्यनिर्मितीस बळ देणारी रेषा कार्यान्वित झाली असेल, असे मला राहून राहून वाटते. हे परमेश्वरी देणं आहे म्हणून मी आजपर्यंत ललितनिबंध, लेखसंग्रह, विनोदी कथा, चरित्र लेखन, तत्त्वज्ञान, आत्मचरित्र आदी विविध साहित्य प्रकारात बागडू शकलो. आतापर्यंतच्या आयुष्यात १०१ पुस्तकांचे लिखाण व प्रकाशन केले, ही माझ्या शिक्षणाच्या मानाने एक गरुडभरारीच म्हणावी लागेल...'' असे भरभरून सांगणारे, उत्साहाने बोलणारे ८० वर्षीय विठ्ठलराय भट पाहिले की आपल्याला आपल्या तारुण्याची लाज वाटते. काय या माणसाची जिद्द, परमेश्वरानेदेखील हात टेकावेत.

कारवार जिल्ह्यातील कडवाड या खेडेगावातील स्वातंत्र्यपूर्व काळातील म्हणजे १९३५ सालातील जन्म. त्या खेडेगावातील ते निसर्गसंपन्न जीवन. एका बाजूला काळी नदी तर दुसऱ्या बाजूला हिरवागार डोंगर. मध्ये शेती, बागायती, ओढे, नाले, शालेय जीवनातील त्या सुंदर प्रदेशातून चालताना मिळणारा सुखद आनंद

अवर्णनीय असाच. न्यू इंग्लिश स्कूल, बाड (कारवार) या शाळेतून उत्तम गुणाने पास झालेले हे गृहस्थ हलाखीच्या परिस्थितीमुळे पुढे शिकू शकले नाहीत. तो काळच तसा होता. मॅट्रिक होणे म्हणजेच आपल्या मुलाने मोठे दिव्य केल्याची अनुभूती मिळणे असा तो काळ! परंपरागत चालत आलेले पौरोहित्य सांभाळणे व आजूबाजूच्या गावातील पूजा सांगून पोट भरणे हे काम. मॅट्रिक झाल्यानंतर विठ्ठलराय भटांनी पैंगीण येथील पर्तगाळ मठात वैदिकीचे शिक्षण घेतल्यामुळे पूजा सांगण्यास येते म्हणून, लोकांचे बोलावणे येई. पण ते त्यांना कधीच आवडत नसे. पण पोटाची खळगी कशी भरणार हा प्रश्न मोठा! घरातील वडीलधाऱ्या मंडळींचा धोशा लागलेला - आता नोकरी करून लग्न कर म्हणून. अशाच विवंचनेत असताना पॉप्युलर इंग्लिश स्कूल, चोंडिये येथे शिक्षक म्हणून ते कामाला लागले. पण आयुष्य सुरळीतपणे जावे हे बहुतेक त्यांच्या कुंडलीत लिहिलेले नव्हते. चोंडिये येथे विद्यार्थिप्रिय शिक्षक म्हणून नाव झाले असते पण व्यवस्थापनाला ते मान्य नव्हते. कारण यांना तेथे चाललेला भ्रष्टाचार पाहवत नव्हता. दरम्यान अघटित घडले. विठ्ठलराय सांगतात, ''डि.के.मोटर्स येथे नोकरी करताना बळावलेल्या टायफाईडने मला घरी जावे लागले. दोन-तीन महिने अंथरुणावर पडून आजार बरा झाल्यानंतर परत नोकरीची भुणभुण सुरू झाली. विविध आस्थापनातून अर्ज करणे चालू होते. तेवढ्यात पोस्टमन म्हणून सांबराणी या गावी हजर होण्याचे पत्र मिळाले. भटाचा पोरगा पोस्टमनकी करणार म्हणून काहीजणांनी नावे ठेवली. घरातूनही विरोध होता.'' पण विठ्ठलरायांना अवास्तव विरोध रुचण्यासारखा नव्हता. ते सांबराणी येथे पोस्टमन म्हणून रुजू झाले. त्याकाळी भटांनी काय कामे करावीत याचा अलिखित नियमच समाजाने ठरवून ठेवला होता असे दिसते. गावागावातून हिंडून पत्रांचा घरोघरी बटवडा करायचा. त्यासाठी एक सायकल घेतली होती. त्या सायकलवरून फिरून टपालांचा बटवडा करायचा हे नित्याचे काम होऊन बसले. असेच एकदा भागवती नावाच्या एका खेडेगावात जायची वेळ आली. मुख्य रस्त्यापासून किर्रर अशा जंगलातून सात-आठ मैल गेल्यावर नदीकाठी वसलेले हे भागवती खेडं. या खेड्याच्या अवतीभवती रानडुक्कर, वाघ, हत्ती, अस्वल इत्यादी

हिंस्र पशूंचा वावर सदैव असे. एक दिवस सकाळीच विठ्ठलराय रजिस्टर्ड टपाल व मनिऑर्डर घेऊन भागवती गावाला गेले. तेथूनच परतीच्या वाटेवर चढाव आहे म्हणून सायकल घेऊन पायी चढाव चढत असताना अकस्मात रस्त्याच्या मधोमध पट्टेरी वाघ येऊन उभा राहिला. या अनपेक्षित व्याघ्रदर्शनामुळे ते गर्भगळीत झाले. वाघ एकटक यांच्याकडे क्रूरपणे पहात होता व हे भेदरलेल्या डोळ्यांनी वाघाकडे एकटक पहात उभे होते. मागे पळावे तर पाय जमिनीवरून हालत नव्हते. दरदरून घाम फुटला होता. जवळजवळ बेशुद्धावस्थेत पोचल्यासारखी स्थिती झाली होती. तेवढ्यात मागून एक ट्रक आला व त्या आवाजाने वाघ गोंधळला. लांब उडी मारून जंगलाच्या बाजूला पळून गेला. काळ आला होता पण वेळ आली नव्हती. ट्रकवाल्याने लांबून हे दृश्य पाहिले होते म्हणून तो जवळ आला व त्याने यांना धीर दिला. सायकल ट्रकमध्ये घातली. सांबराणी बसस्थानकावर पोचवले. कसेबसे घरी पोचले व अनपेक्षित व्याघ्रदर्शनाने गर्भगळीत झालेल्या विठ्ठलराय यांना ज्वराने धरले. डॉक्टरांनी उपचार करून पाहिले व हळीयाळीत प्रसिद्ध खासगी डॉक्टरांच्या दवाखान्यात हलविण्याचे ठरवले. दुसऱ्या दिवशी सकाळी उठायचा प्रयत्न केला तर त्यांचे दोन्ही हात व दोन्ही पाय थंडगार होऊन लुळे पडले होते. त्यादिवशी अमावस्या होती व खंडग्रास सूर्यग्रहण होते. खेड्यातील लोकांनी पोस्टमनला अवसेच्या दिवशी गिराण लागले अशी आवयी उठवली. हळियाळला डॉक्टरांनी याची कर्मकहाणी ऐकून घेतल्यानंतर याला मानसिक धक्क्यामुळे स्नायुआकुंचनाचा रोग झाला आहे असे सांगून सरकारी हॉस्पिटलमध्ये नेण्याचा सल्ला दिला. पण एका नातेवाईकाने यांना झाडपाल्याचे औषध घेण्याचा सल्ला दिला आणि तो त्यांना महागात पडला. कारवार येथील सिव्हिल हॉस्पिटलमध्ये भरती केल्यानंतरच्या उपचाराने यांच्या लुळ्यापांगळ्या झालेल्या शरीरात थोडे त्राण आले. त्या हॉस्पिटलमधील चार महिन्याच्या वास्तव्यात तेथील नर्स मीरा कामत यांच्या पुस्तकवेड्या स्वभावामुळे यांनाही पुस्तके वाचायला मिळू लागली. जॉन व्हिस्कार्डी ज्युनिअर यांचे आत्मचरित्र वाचून विठ्ठलराय अतिशय प्रभावित झाले व त्यामुळेच जीवनाची आजपर्यंतची खडतर वाटचाल त्यांनी सुरू ठेवली आहे.

यानंतर सदानंद हॉटेल, कडवाड येथून पुढे आरे मिल्क कॉलनी, नायक ट्रेडिंग कंपनी, सिनेमेटोग्राफ रेन्टर्स सोसायटी लिमिटेड, मलबार मोटर्स, नॅशनल स्मॉल इंडस्ट्रीज कॉर्पोरेशन,जीवन बीमा निगम, डी.व्ही. इंडस्ट्रीज अशा अनेक आस्थापनांमध्ये काम करून शेवटी इन्डो अमेरिकन चेंबर ऑफ कॉमर्स, चर्चगेट या आस्थापनांतील नोकरीतून त्यांनी निवृत्ती स्वीकारली. फक्त मॅट्रिक झालेला एक अपंग माणूस अशा विविध संस्थांमधून काम करत इन्डो अमेरिकन चेंबर ऑफ कॉमर्स व फिक्की येथे पीआरओ व सल्लागार म्हणून काम पहात निवृत्त झाला हेच विठ्ठलराय भटांचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल.

अपंगत्व, गरिबी व अपुरे शिक्षण या अडचणीवर मात करून जिद्दीने सामाजिक, शैक्षणिक व साहित्य क्षेत्रात उल्लेखनीय कामगिरी केल्याबद्दल विठ्ठलरायांना अमेरिकन बायोग्राफिकल इन्स्टिटयूटच्या वतीने पुरस्कारही दिला गेला आहे. मे महिन्याच्या ५ तारखेला त्यांनी ऐंशीव्या वर्षात पदार्पण केले आहे. अजूनही ते भरभरून बोलतात, लिहितात व नवोदित लेखकांना लिहिण्यास प्रोत्साहित करतात. नवोदित लेखकांना त्यांच्या पुस्तकांचे प्रकाशन करण्यासंदर्भात मार्गदर्शन करतात. तरुणाला लाजवेल अशा या कार्यकर्तृत्वासाठी चाहत्यांकडून त्यांच्यावर शुभेच्छाचा वर्षाव होताना दिसतो. विठ्ठलरायांच्या लेखनकार्याला सलाम करावा तितका थोडाच असे वाटून जाते.

***

श्री. श्रीहरी आठल्ये Dirctor-in-charge, Janashikshan Sansthan (Aided by Financial Ministry, Govt. of India, Goa) या पदावर असून ते दै. गोवादूतासाठी मानद पत्रकार म्हणून काम करतात.
संपर्क : ०९७३००२३३१८, पणजी (गोवा)

# १२.साहित्याद्वारा साधती जनहित !

–नीलिमा नाडकर्णी

जीवनात काही वेळा असे काही योग येतात, ज्यांना 'शुभयोग'च म्हणावयास हरकत नसते! 'कारवार, निसर्गाचे नयनरम्य लेणे' या पुस्तकातील लेखनाच्या निमित्ताने असाच एक योग आला. हा योग होता, 'श्री. विठ्ठलराय भट' यांच्याशी झालेल्या परिचयाचा ! अर्थात, प्रत्यक्ष भेट झाली नाही. पण दूरध्वनीवरून होत असलेल्या संभाषणातून आणि त्याहीपेक्षा जास्त त्यांच्या लेखनातून तो होत गेला.

दैवाच्या एका निर्घृण प्रहाराने शारीरिक दुर्बलता आली, तरी तिच्यावर मात करून एक यशस्वी जीवन व्यतीत करणारे लेखक, म्हणून ते आदरणीय आहेतच. पण आयुष्याच्या प्रवासातील ऐंशी क्रमांकाचा मैलाचा दगड जवळ येऊन ठेपला असतानाही, तो जणू अठरा क्रमांकाचा असल्याप्रमाणेच उत्साहाने आणि जोमाने लेखन करीत राहणाऱ्या श्री. भट यांना द्यावे तितके श्रेय अल्पच ठरेल !

वेगवेगळ्या ठिकाणी त्यांनी केलेल्या नोकऱ्यांचा तपशील ऐकणाऱ्याला चक्रावून टाकण्यासारखाच आहे! त्यात शिक्षकापासून पोस्टमनच्या नोकरी-पर्यंतचाही अंतर्भाव आहे. हॉटेल चालविण्याचा अनुभवही आहे, तर इंडो-अमेरिकन चेंबर ऑफ कॉमर्स यांमध्ये केलेल्या नोकऱ्यांचाही समावेश आहे! सुप्रसिद्ध लेखक श्री. महाबळेश्वर सैल यांनी त्यांच्या 'नोकरनामा' या पुस्तकाबद्दल विवेचन करताना म्हटले आहे, ''भट यांनी अनेक नोकऱ्या धरल्या व सोडल्या. त्याची कारणे उद्‌बोधक आहेत. प्रत्येक नोकरीने त्यांना समृद्ध घडवलं आहे, त्यातूनच त्यांचं व्यक्तिमत्त्व घडलं आहे'' आणि हे उद्‌गार खरोखर सार्थ आहेत !

'साहित्यमग्न' या पुस्तकातून श्री. भट यांच्या अपार लेखनसामर्थ्याचे दर्शन घडतेच, शिवाय त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या नानाविध पैलूंवर प्रकाशही पडतो! 'जांबावली ते आंबीवली' हे त्यांचे पुस्तक त्यांचे बालपण, त्यांचे शालेय जीवन वगैरेंचा एक समग्र पट आपल्यासमोर उलगडतेच. शिवाय ''बाड-सुंकेरी पूल व्हावा, म्हणून बांधकाम मंत्री श्री. रामकृष्ण हेगडे यांना विनंती करून त्याचा पाठपुरावा करतात, व जनहिताच्या कार्यातही मनापासून सहभागी होतात,'' या श्री. भटांच्या विधायक कार्याचे वर्णन श्री. मनोहर कोरगांवकर यांनी यथार्थ शब्दात केले आहे, तेही वाचावयास मिळते.

श्री. भट यांचे एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या लेखनात मराठी, कोंकणी, इंग्रजी या तिन्ही भाषांचा त्रिवेणी संगम आहे. 'पोवळ्यां माळ', 'घाण्याचो बैल' यांसारखे कथासंग्रह त्यांच्या निरीक्षणशक्तीचे आणि कोंकणी भाषेवरील प्रभुत्वाचे एक उत्तम उदाहरण आहे, हे डॉ. माधवी सरदेसाई यांनी व्यक्त केलेले मत कुणालाही सहज पटण्यासारखे आहे. डॉ. सर्जू काटकर यांनी तर त्यांना एक अप्रतिम उपाधी दिली आहे. "Cultural Ambassador of Karnataka, in Maharashtra खरेच! मराठी आणि कोंकणी या दोन्ही भाषा-संस्कृतींना एकत्र आणून जवळीक साधण्याचे आगळे कार्य ते करीत आहेत.

श्री.भट एक निसर्गप्रेमी आहेतच. पण त्यांच्या लेखनाला एक वैचारिक, तत्त्वज्ञानविषयक बैठक असल्यामुळे श्री. बी.बी.राणे यांनी त्यांच्याबद्दल 'अर्वाचीन ऋषी' असे गौरवोद्गार काढले आहेत! 'जांबीवली ते आंबीवली' या श्री. भट यांच्या पुस्तकाबद्दल श्री. द.ना.नाडकर्णी यांनी तर अत्यंत चपखल शब्दात लिहिले आहे, ''विठ्ठलरायांचे पुस्तक हे केवळ आठवणींची जंत्री नसून त्यांनी त्यांच्या बालपणाच्या चालीरीती, संस्कार, कुलाचार यांचे अशा प्रकारे वर्णन केले आहे, की कालातंराने हेच पुस्तक 'सोशन एन्थ्रॉपॉलॉजी' या विषयाच्या संशोधकाला एक खजिनाच वाटेल!'' वाचकाकडून असे प्रशस्तीपत्रक मिळणे, याहून लेखकाचे मोठे भाग्य कोणते ?

श्री. भट यांचे एक सुहृद श्री. मधुकर पै यांनीही आपल्या या लेखकमित्राच्या

विविध पैलूंवर प्रकाशझोत टाकला आहे. ते म्हणतात, 'संघर्षाच्या काळात जमेल तसे समाजकार्य करीत व अन्यायाविरुद्ध निधड्या छातीने लढा देत श्री. भट यांनी आपली साहित्यसंस्कृती इंग्रजी, मराठी, कोंकणी भाषेत पुस्तके, लेख वगैरे लिहून जोपासली. 'आपले साहित्य म्हणजे वाचकांशी साधलेला संवाद', ही त्यांची धारणा-यातूनच हे वाचकांना सकारात्मक विचाराने क्रांती साधण्याचा संदेश देतात.'' वाचकांशी सतत ठेवलेला संपर्क हे त्यांचे आणखी एक वैशिष्ट्य!

'आपणांसारिखे करिती तात्काळ' ही म्हण चांगल्या अर्थाने प्रत्यक्षात उतरविणाऱ्या श्री. भट यांची 'तशी' ओळख श्री. आनंद गायतोंडे यांच्या Book Lover या लेखामधून होते. स्वतः पुस्तकप्रेमी असलेल्या श्री. भट यांनी श्री. गायतोंडे यांच्यासमोर मराठी साहित्याचा जणू खजिनाच उघडून ठेवला ! 'कोसला'पासून प्रारंभ करीत 'ब्र', 'आयदान', 'बारोमास' वगैरे पुस्तके त्यांना दाखवीत अच्युत बर्वे, कविता महाजन, भालचंद्र नेमाडे, लक्ष्मण गायकवाड यांसारख्या साहित्यिकांशी त्यांच्या पुस्तकांच्या माध्यमातून परिचय करून दिला.

श्री. भट यांनी कथा, कविता, विनोद, तत्त्वज्ञान यांसारखे अनेक साहित्यप्रकार हाताळले असले, तरी सौ. अक्षता देशपांडे यांनी खास उल्लेख केला आहे, तो त्यांच्या पुढील पुस्तकांचा ! 'नादब्रह्माचे मानकरी', 'नोबेल पुरस्कारांचे मानकरी', 'दूर देशींचे नामवंत' यांसारख्या त्यांच्या पुस्तकांमधून 'शास्त्रीय संगीतामधील दिग्गज कलाकार', विदेशी वैज्ञानिक, विदेशी कलावंत-नट-नट्या यांच्या कर्तृत्वाची जी माहिती दिली आहे,ती सामान्य माणसाच्या दृष्टीने नव्यानेच झालेली ओळख असते, हे त्यांचे मत कोणालाही पटण्यासारखे आहे!

'मोरया प्रकाशन'चे श्री. दिलीप महाजन यांनीही श्री. भट यांच्या लेखन-प्रपंचाचे कौतुक करीत म्हटले आहे, ''त्यांच्या प्रकाशित पुस्तकांची संख्या शंभरपर्यंत पोहोचली आहे. शारीरिक अपंगत्वावर मात करून खडतर तपश्चर्येने त्यांनी हे यश प्राप्त केले आहे, अनेक साहित्य प्रकार उत्तर रीतीने हाताळलेले आहेत. त्यांची धडपड वाखाणण्यायोगी आहे !''

श्री. कृष्णानंद बांदेकरांना वाटते, ‘उतारवयातही श्री. भट यांचा जीवनोत्साह, मानवी संबंध जोडण्याची कला, साहित्यिक व वाचकांबरोबरचे बांधव्य व सतत संपर्क ठेवून तो सांभाळण्याची रीत खरेच स्फूर्तिदायक आहे.’ ‘मुक्तागंण प्रकाशन’च्या श्री. राजू भानारकर यांना तर ते गुरू व मार्गदर्शकच भासतात.

सदैव साहित्यजगतातच रममाण असणारे श्री.भट दैनंदिन जीवनात एक मायाळू आजोबा, प्रेमळ मामा, वत्सल काका, जिवलग सुहृद अशा अनेक नात्यांनी अनेकांशी गुंफलेले दिसतात. समाजात लेखनसंस्कृती व वाचनसंस्कृती अधिकाधिक पल्लवीत होत जावी, यासाठी त्याचीच आस, त्याचाच ध्यास धरणारे श्री. भट ‘हसत हसत तरुण’ बनण्याचा संदेश सहजपणे देऊन जातात आणि स्वतःच्या या सकारात्मक दृष्टिकोनामुळे जीवन कृतार्थ झाल्याचे नमूद करतात.



सौ. नीलिमा शशिकांत नाडकर्णी यांनी पदवी प्राप्त केल्यानंतर काही काळ अध्यापनाचे काम केलं. लेखनाची उर्मी जबरदस्त. मराठीतले नामांकित दैनिक व मासिकांतून त्यांचे सातत्याने दर्जेदार लेखन चालू असते. त्यांच्या ‘तरंग’ ह्या पुस्तकाला पुरस्कार प्राप्त झाला आहे. त्यांनी काही काळ इंग्रजीतून पण लेखन केले आहे.
संपर्क : ०२२-२४३०९५४४ माहिम.(मुंबई)



# १३. लोभस व्यक्तिमत्त्व

-डॉ.के.जी.कुलकर्णी

एका लोभसवाण्या व्यक्तीचा परिचय अल्पकाळात करून देणे अवघड आहे. त्यांच्याशी परिचय झाला हा माझ्यासाठी आनंदाचा क्षण ठरलाय. त्यासाठी चार वर्षे मागे जावे लागतय. मी भूगोल विषयाचा अध्यापक म्हणून सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालयात कार्यरत होतो. माझा टपाल तिकीटे, चलनी नाणी, नोटा, स्वाक्षरी जमविण्याचे छंद खूपच जुने आहेत. याठिकाणी स्वाक्षरी संग्रहाचाच संदर्भ येणार आहे. गेली तीस वर्षे स्वाक्षरी जमविण्याचा छंद जोपासतो आहे. संग्रहात २००० च्या वर साक्षऱ्या आहेत. यात सर्व क्षेत्रातील मान्यवरांच्या स्वाक्षऱ्या आहेत. स्वाक्षरी दोन प्रकारात घेतो. एक मान्यवरांस प्रत्यक्ष भेटून आणि दुसरा प्रकार मान्यवरांना पत्र पाठवून.

श्री. विठ्ठलराय भट यांचा परिचय झाला तो दुसऱ्या प्रकारामुळे. मिरजेच्या बायसिंगर ग्रंथालयात त्यांचे एक पुस्तक वाचनात आले आणि पुस्तक आवडल्याचे दि. १४-२-२००९ रोजी अभिप्राय देणारे पत्र पाठविले आणि नवल म्हणजे त्यांचे स्वाक्षरी, छायाचित्रासह दि. १८-२-२००९ रोजी उत्तर आले. आश्चर्याचा अनोखा धक्काच होता. आजपर्यंतचा स्वाक्षरीसाठी एखाद्यास पत्र लिहिले तर उत्तरास खूपच वेळ लागतो. एका साहित्यिकांनी माझे पत्र पुस्तकात खूण म्हणून दीर्घकाळ वापरले मग पाच वर्षांनी क्षमस्व म्हणत स्वाक्षरी पाठविली. त्यामुळे हा अनुभव वेगळाच ठरला. नंतर श्री. विठ्ठलराय भट यांना आभाराचे पत्र पाठविले, त्यालाही त्यांनी लगेच उत्तर पाठविले. यातून पत्र मैत्री सुरू झाली. त्यांच्या उत्तरातून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू समजून येऊ लागले. त्यातून पुढे दूरध्वनी संभाषण सुरू झाले. अगदी मोजके शब्द असणारे

त्यांचे संभाषण आवडण्यासारखे होते. ममतेने संग्रहाची केलेली विचारपूस मानसिक बळ वाढविणारी होती. संग्रह वाढविण्यास प्रोत्साहनपर त्यांचे शब्द आवडणारे होते. दरम्यान त्यांनी स्वतःची काही पुस्तके पोस्टाने पाठविली. तिथून सुरू झाला लेखक श्री. विठ्ठलराय भट यांच्याशी परिचय. त्यांच्याविषयीचा आदर वाढू लागला. एकदा त्यांना सहज लिहिले आपणांस भेटण्याची इच्छा आहे, ते म्हणाले बघू या.

एकदा दुपारी श्री. विठ्ठलराय भटांचा घरी फोन आला की पुढच्या आठवड्यांत मी आपणांस भेटावयास येतोय, या एका वाक्याने आम्हा सर्वांना खूपच आनंद झाला, वाट पाहाण्यास सुरुवात झाली. दि. ४ मार्च २०१२ रोजी दुपारी त्यांचा दूरध्वनी आला की मी मिरजेत येतोय आपण गांधी चौकात यावे. तिथे स्कूटरने गेलो. तिथे कारमध्ये ते बसले होते. प्रथमच भेट होती पण नजरेनेच ओळख पटली व ते घरी आले. सोबत त्यांचे सहकारी मित्र श्री. सय्यदभाई हे पण होते.

घरी आल्याबरोबर प्रथम त्यांनी आम्हा कुटुंबियाची आस्थेने चौकशी केली. मग म्हणाले, आता आपला स्वाक्षरी संग्रह दाखवा. संग्रह माडीवर होता. पण त्यांच्या पावलावर प्रवासामुळे सूज आलेली होती. त्यांना बसल्या जागीच संग्रहाच्या फाईल्स दाखविण्याचे ठरविले. प्रथम त्यांना प्रथमदिन आवरणावर घेतलेल्या स्वाक्षऱ्या दाखविल्या. यात पोस्टाने टपाल तिकीट प्रकाशन करताना एक पाकिट, त्याच्यावर ते टपाल तिकिट, त्याचे महितीपत्रक असा संच काढला जातो. टपालतिकीटाच्या विषयी संबंधित असलेल्यांची स्वाक्षरी घेतो. उदा. राजीव गांधी यांच्या टपाल तिकीट पाकिटावर सोनियाची, डी.आर.डी.ओ. पाकिटावर ए.पी.जे. अब्दुल कलाम यांची, संजय गांधींच्या पाकिटावर मनेका गांधी यांची, ऋतुरंग पाकिटावर किशोरी आमोणकर यांची, अशा १६५ पाकिटावर २१० स्वाक्षऱ्या संग्रहात आहेत.ही सर्व पाकिटे श्री. विठ्ठलराय भट अतिशय उत्सुकतेने पाहात होते. त्याविषयी, अनेक व्यक्तीसंबंधी मार्मिक टीकाटिप्पणी करीत होते. त्यातून मला खूप नवी माहिती पण मिळत होती. आपण स्वाक्षरी घेतलेली व्यक्ती किती महान आहे. त्यांचे कार्य हे सर्व नव्याने कळत होते, याचा आनंद होत होता. संग्रह पाहून झाल्यावर त्यांनी स्वाक्षरी घेताना कसे अनुभव आले असे विचारले, त्यांना

काही अनुभव सांगितले- उदा. डॉ.ए.पी.जे. अब्दुल कलाम यांची स्वाक्षरी घेण्यासाठी शिवाजी विद्यापीठात गेलो. त्यांना भेटल्यावर त्यांनी प्रथम नाव, संशोधनाचा विषय, संशोधनपर लेख, परिषदातील सहभाग याची माहिती विचारली आणि मग स्वाक्षरी दिली. हा सुखद अनुभव आला. याउलट एका तत्त्वज्ञानी व्यक्तीने ''स्वाक्षरी देणे म्हणजे आत्मा विकणे'' असे म्हणत स्वाक्षरी देणे नाकारले. दुसऱ्या भेटीत मागचा विचार विसरुन हसत हसत स्वाक्षरी दिली आणि आपले विधान गंमत म्हणून घ्या असे म्हटले, याचीच मला गंमत वाटली. एका प्रख्यात कवी महोदयांनी म्हटले, ''प्रथम एका निरक्षकास साक्षर करा त्यांची स्वाक्षरी घ्या'' पण स्वाक्षरी वहीत त्यांनी मराठी, इंग्रजीत स्वाक्षरी केली. याप्रकारचे असंख्य अनुभव हा संग्रह करताना येत गेले. हे सर्व ऐकत श्री. विठ्ठलराय भट रंगून गेले पण घड्याळ हा अडथळा समोर होता.

संग्रह पाहून झाल्यावर चहापान झाले,त्यांना विनंती केली की हा संग्रह पाहून आपणांस काय वाटते तर त्यांनी अभिप्राय वहीत स्वाक्षरीसह अभिप्राय लिहिला. त्या लिखाणातून त्यांची माया जाणवत होती. त्यांनी लिहिले की ''त्यांची चिकाटी पाहून मी भारावून गेलो, ती तरुणाला ही लाजवेल अशी आहे संग्रह पाहाताना मी हरखून गेलोय.''

आज अखेर हा वयाचे अंतर न मानणारा मित्र मिळाला ही भावना आहे. त्यांचे ऋजु व्यक्तिमत्त्व, साधी सोपी भाषा, एकदा एखाद्यास आपले म्हटले की मायेची बरसात होते. त्यामुळे मी श्री. विठ्ठलराय भट यांना मानतो. काही कारणाने वेळी त्यांना इकडे येता आले नाही पण त्यांना दाखविण्यासाठी एक पत्र संच तयार ठेवला आहे. या संचात- लो.टिळक, नामदार गोपाळकृष्ण गोखले, लालालजपत राय, सरोजनी नायडू, मोतीलाल नेहरू, मदन मोहन मालवीय, ग.वा. मावळंणकर अशा पन्नासच्यावर पत्रे त्यांच्या हस्ताक्षरातील ठेवली आहेत. बघु या कधी हा योग येतोय. अशा लोभसवाण्या, मृदुव्यक्तीविषयी लिहिणे हा एक खूपच आनंददायी योग आहे.

***

प्रा.डॉ.के.जी. कुलकर्णी यांनी भूगोल विषय घेऊन पी.एच.डी. पदवी प्राप्त केली आहे. ३५ वर्षे सांगली येथील विलिंगडन महाविद्यालयात अध्यापन करून निवृत्त झाले आहेत. अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय भूगोल विषयक परिसवांदात सहभाग. अर्धशतकावर शोधनिबंध प्रकाशित!

छंद : स्वाक्षऱ्या गोळा करणे, नोटा-नाणी जमविणे इ.

संपर्क : ०२३३२२११०७८- मिरज



# १४. योगायोगाच्या गोष्टी

–अनघा तांबोळी

आयुष्याच्या वळणावर जर योग्य व्यक्ती भेटत गेल्या तर आपल्यासारखे भाग्यवान आपणच...!

मी सायन्सची विद्यार्थिनी, *MBA-Hospital Admin.* विषयांत केलं आणि *Hospital Administrater* म्हणून मुंबई, बंगलोर मधल्या वेगवेगळ्या हॉस्पिटलमधून काम करत गेले. कुठल्यातरी अज्ञात क्षणी मनात 'मुरली पावा वाजवून जावा' तसं झालं अन् लक्षात आलं की आपण लिहितं राहीलं पाहिजे. हे माझ्या आयुष्यातलं महत्त्वाचं वळणं होतं.

'वाचकांना मी लिहिलेलं आवडतं!' एवढ्या शिदोरीवर लिहायला सुरुवात केली खरी, पण पुढे काय? असा प्रश्न होता. घरात, आजूबाजूला साहित्य क्षेत्रातल्या व्यक्ती नाहीत. 'ओळखी नाहीत', 'आगे बढो...' म्हणायला कुणी नाही..!

अशा वेळी केवळ अन् केवळ फक्त योगायोगाने जोशीकाकांमुळे माझी भटसरांशी 'फोनोळख' झाली! आणि कसं असतं ना... काही लोकांशी आपलं नातं, वर्षानुवर्ष रोज भेटत, बोलत राहिलो तरी, उपाचाराच्या पुढची मजल गाठत नाही अन् सरांशी माझं जुळलेलं नातं 'उपचाराशिवायं'चं होतं. 'उपचाराशिवाय' रोगी दगावेल एकवेळ, उपचाराशिवाय असलेलं आमचं नातं अतिशय सुदृढ अन् निरोगी आहे.

घरातल्या वडिलधाऱ्यांचा पाठीवर हात असल्याची भावना मला नेहमी भटसरांशी बोलतांना येत गेली. कुठलीही अडचण वाटली, कुठलाही प्रश्न पडला की भटसरांचा नंबर निःसंकोचपणे फिरवता येतो आणि सरही मोठ्या आत्मियतेने

आणि मनापासून मदत करत असतात.त्यांचे अनुभव, त्यांचं मैत्र ते आपल्यासाठी मनमोकळेपणे खुलं करून देतात. यासारखी माझ्यासाठी निखळ आनंदाची गोष्ट ती काय असणार?

त्यांचं साहित्य क्षेत्रातले कर्तृत्वही वाखाणण्याजोगं आहे, अनेक पुरस्कारांचे ते मानकरी आहेत. एवढं अफाट कर्तृत्व असूनही, कुठेही, 'अहं'पणाचा उग्र दर्प त्यांच्या बोलण्यात कधीच नसतो. एखादं पूर्ण बहरलेलं झाडं जसं लिनतेने झुकलेलं असतं... किंवा एखादं पिकलेलं फळं जसं गाभ्यापर्यंत गोड असतं... तसा गाभ्यातूनही गोड असलेला हा माणूस आहे असं मला वाटतं.

सरांना मी माझ्या 'गुरुस्थानी' मानते. एकलव्य आणि द्रोणाचार्यांच्या बाबतीत जसं, एकलव्य धनुर्विद्या, प्रत्यक्ष समोर द्रोणाचार्य नसतांना शिकणं.मनोमन तो द्रोणाचार्यांना आपले गुरू मानत होता.. तसं काहीसं माझ्या बाबतीत आहे. ज्या सरांना मी मनोमन *Mentor* मानते त्या भटसरांना मी अजूनही पाहिलेलं नाही. त्यांना भेटण्याचा योग आलेला नाही...खरंच विचार केला की खूप आश्चर्य वाटतं!

माझ्यासारख्या अनेकांच्या पंखात बळ देण्याचं काम सर मोठ्या प्रेमाने आणि उत्साहाने करत असतात म्हणूनच माझ्यासारखे अनेक धडपडणारे जीव घरटं सुटून खाली पडण्याऐवजी किंवा भरकटण्याऐवजी एका दिशेने उडायचा प्रयत्न करू शकतात.

एखाद्या व्यक्तीला जगात आणण्याचं काम निःसंशयपणे त्याचे जन्मदात्रे करत असतात. तर त्या व्यक्तीला पूर्णाशाने प्रगल्भतेकडे नेण्याचं काम सरांसारखे निर्मम जीव करतात !

या सगळ्या गोष्टींमुळे मी सरांची मनापासून ऋणी आहे. त्यांच्या पुढच्या वाटचालीसाठी आणि उत्तम आयुरारोग्यासाठी माझ्याकडून मनापासून शुभेच्छा!!



सौ. अनघा तांबोळी, शिक्षणाने व पेशाने वैद्यकिय क्षेत्रात वावरल्यातरी त्या खऱ्या अर्थानी रमल्या साहित्यक्षेत्रात. काव्य, नाट्य, कथा, प्रवासवर्णन, ललितलेख असे विपुल लेखन. अनेक पुरस्कारांनी अलंकृत. विशेष निमंत्रित कवयित्री. अनेक नियतकालिकांतून सातत्याने लेखन.

सौ. अनघाने पूर्णवेळ लेखनासाठी स्वतःला वाहून घेतलं आहे, हे विशेष.

संपर्क : ०९८८६६७४०२१ बेंगळुरू.





# १५. जीवेत शरदः शतम्

– अपूर्वा कर्पे

त्यावेळी आम्ही टूरवर होतो. नुकतच माझ्या दोन पुस्तकांचं प्रकाशन झालं होत, त्याबद्दल इथून तिथून प्रतिक्रिया येत होत्या आणि अचानक यांचा मोबाईल वाजला! विठ्ठलराय नावाची व्यक्ती बोलत होती. त्यांनी माझं पुस्तक वाचनात आल्याचं व आवडल्याचं सांगितले. आपण थोडे दिवस गोव्यात आहोत, जमल्यास भेटून जा असंही सांगितलं. पण टूरवरून आलो आणि कळलं की ते मुंबईला परतले. खूप चुटपुट लागून राहिली...

आपल्या पुस्तकांबद्दल एखादा भरभरून बोलतोय, आणि तोही कोणी साधासुधा नाही तर शंभरावर पुस्तकं लिहिलेला साहित्यव्यासंगी ! मी तर भारावूनच गेले...

त्यानंतर लगेच त्यांचं एक पत्र आलं, त्यात त्यांनी माझा प्रत्येक लेख, प्रत्येक कथेबद्दल लिहिलं होतं, काहींच कौतुक केलं होत तर काही चुकाही दाखवल्या होत्या. हळूहळू त्यांच्याबद्दल माहिती मिळाली व अनुभवही आला.

माझ्या बहुतेक सणांची सुरुवात त्यांच्या शुभेच्छांनी होते! आजपर्यंत त्यांनी मला आपली अनेक पुस्तकं स्वखर्चाने पाठवली. असा साहित्यिकच विरळा!

'साहित्यमग्न'मधून त्यांची साहित्याबद्दलची तळमळ नि त्यासाठी Out of way जाऊन काहीही करायची तयारी आश्चर्यचकित करते. साहित्यमग्न वाचतांना जाणवलं, की अरे! आपल्यासारख्या अनेक लेखिका, लेखक आहेत, ज्यांना विठ्ठलरायांचं निःस्वार्थी मार्गदर्शन लाभलं आहे !

साहित्याच्या क्षेत्रात टिंबाएवढंही अस्तित्व नसलेल्या माझ्यासारख्या लेखिकेला, त्यांच्यासारख्या उत्तुंग व्यक्तिमत्त्वाने केलेलं मार्गदर्शन, मला माझ्या पुढच्या प्रवासात शुभसूचक वाटतं.

या अशा व्यक्तीला परमेश्वर उत्तम आरोग्य व दीर्घायुष्य देवो जेणेकरून त्यांच्या या वटवृक्षाच्या छायेत माझ्यासारखा अनेक लेखक, लेखिका बहरून येऊ देत.



सौ. अपूर्वा उत्कर्ष कर्पे या गोव्यातल्या विविध दैनिकांतून, मासिकांतून सातत्याने लेखन करतात. दै. लोकसत्ता (लोकरंग) मधून त्यांचे लेख प्रकाशित.

'जीवनाच्या वाटेवर' व 'मंत्र सुखाचा' ही दोन पुस्तके प्रकाशित. 'जीवनाच्या वाटेवर' या ललितसंग्रहाला 'तुका म्हणे भगवान ठग-बुलडाणा' पुरस्कार. अखिल गोमंतक वैश्य परिषदेतर्फे कै. बाप्पा टोपले पुरस्कार. दोन पुस्तके प्रकाशनाच्या वाटेवर.

संपर्क : ०९८५०४७१५८७ कुडचडे (गोवा)



# 16. To Sir, with Love

-Chitanya Sakhalkar

"He is Bhat Sir, your Sanskrit Teacher", the class owner said. That was the first time I met Bhat Sir. Little did I knew that I would have the company of such an intellectual person.

After I left private classes, I immediately enrolled for Sanskrit tuitions with Bhat Sir. It was his way of teaching the language that made it very interesting. I not only gained knowledge about Sanskrit but also got to know its finer nuances with our culture and traditions. He also imparted us social values, which few teachers in these days acknowledge.

I completed my SSC and got distinction in Sanskrit (The credit goes to Bhat Sir.) Later in my college days I got to know Bhat Sir as an author and as a kind and knowledgeable person.I often used to visit him. I came to know his love for literature and music.

I still remember that he has always been an imparter of knowledge. Whenever I met him we used to discuss about topics ranging from literature to science, food to music, politics to religion etc. Every moment spent with him is worth several pages of encyclopedia.

There is one thing one cannot miss noticing about Bhat Sir is his simplicity. It is said, " Simplicity is the ultimate sophistication". That's what makes Bhat Sir special in our lives. He has truly been a mentor and a guide in my life.



Chaitanya Sakhalkar, B.Tech.
Hobbies : Travelling, Music, Cooking
Presently Managing : Chaitanya Mangal Seva Catering Services
Contact : 9930652918 Titwala (East) Dist. Thane
Email : chaitanyasakhalkar@gmail.com

# १७. भटसाब

–शंकर के. सुवर्णा

लगभग पचास बरस पहले की बात है । मैं जनमगाव मंगळुरसे बंबईमें कामधाम मिलता है क्या ? ऐसा देखने के वास्ते आया था । उस समय जवाहरनगर, खार (पूर्व) इधर रहनेवाले मेरे पहेचानके एक गाँववाले के साथ रंगास्वामी चालमें रहने लगा । जवाहरनगर झोपडपट्टीका बडा समूह था ।

उन दिनों में भी नोकरी मिलना मुशकिल था । और मैं जादा पढालिखा नहीं था । लेकिन मुझे शिलाई का काम अच्छे तरीकेसे आता था । क्यों वही काम करें । ऐसा सोच कर एक जुना शिलाई मशीन खरेदी किया । अब सवाल पैदा हुआ जगहका । किसीने सलाह दे की श्री. विठ्ठलराय भट कम्युनिस्ट पार्टीके एक प्रभावी कार्यकर्ता पंजाबी चालमें रहते हैं । किसीको भी वे मदत करते हैं । आप उनसे मिलिये, काम हो जायेगा ।

जब मैं श्री. विठ्ठलराय भटको मिला तब मैं उनकी प्रसन्न मुद्रा देखकर और प्यारभरी बाते सुनकर प्रभावित हुवा । भटसाब कारवारके रहनेवाले थे । इसलिये हमारा संवाद कन्नडमें शुरू हुआ । मेरी समस्या जानकर उन्होंने साईबाबा रस्तेपर एक दोस्तका वरांडेपर मशीन रखकर धंदा शुरू करने की चालना दी । ग्यारहा महिनेका करार करके मैंन काम शुरू किया । मैं अच्छा कटर (मास्टर कटर) और मेरी शिलाईभी अच्छी थी । इस वजह काम जोरसे चलने लगा । बरसभरके बाद मैंने बडी जगह भाडेपर लेके दो मशीन खरीद करके धंदा बढाया । Shankar Tailors and Clothiers नामसे आज मेरा दुकान जाना पहचाना जाता है ।

उन दिनों 'महाराष्ट्र एकीकरण समिती' का पूरा राज्यभर बडा धूमधामसे आंदोलन चला था । भटसाब समितीके गणमान्य कार्यकर्ते थे । मैं भी उसमें शामिल हुआ । भटसाब और डॉ.शिवकुमार कुट्टी इन्होंने कार्यकर्ताओंके मदतसे

शिवाजी वाचनालया नामकी वास्तु खड़ी की । उद्घाटनके लिये श्री. आचार्य अत्रेजी आये थे । उनका जोरदार भाषण हुआ ।

मैं दोस्तके जरिये काँग्रेस पार्टीका सक्रिय सभासद बना । युवक काँग्रेस में बांद्रा जिला काँग्रेसका उपाध्यक्ष पदाधिकारी रूपसे योगदान देते आया हूँ। भटसाबका झोपडपट्टी विभागमें अनेक तरहके लोकोपयोगी कार्य बडी धूम धामसे चलता था । उसके में यथाशक्ती हात बटाता था ।

कुछ कारणसे भटसाब आंबीवली (कल्याण नजिक) गाँवके रहिवासी बने। तो भी हमारा दोनों का मिलना जुलना चलते रहा और अभीभी चालू हैं । वे लेखनकला में मग्न रहे और अबतक मराठी, कोंकणी, इंग्लिश इन भाषाओंमें सौसे उपर किताब प्रकाशित की । मैंने उनकी बहुतसारी किताबें पढी हैं और मैं उनसे काफी प्रभावित होता आया हूँ ।

भटसाबने ८० वा जनमदिन पार किया ये बात सुनकर बडी खुशी हुई । उनका जीवन सुखमय और निरामय हो यही मेरी प्रार्थना है ।

***

श्री. शंकर सुवर्णा एक अच्छे, भ्रष्ट्राचारसे सदैव दूर रहनेवाले जानेमाने सामाजिक कार्यकर्ते है । वे काँग्रेस पार्टी के राजमान्य नायक हैं । चाहते थे तो वे नगरसेवक, आमदार भी होते थे । लेकिन उन्होंने चुनाव राजकारणसे खुदको जानबुझकर दूर रखा । वे अनेक संस्थाओंको क्रियाशील कार्यकर्ता, पदाधिकारी और पोषक है।

श्री. सुवर्णाजी Special Executive Officer हैं ।

संपर्क - ०९८६९१३०७५० खार (पूर्व), मुंबई



# १८. आनंदयात्री

–एन. शिवदास

विठ्ठलराय भट हे नाव तशें म्हाका खूप अपरिघितसे आसले. घड्ये तें मुंबयत रावतात आणि गोंयात तांचो साहित्य सहवास आसता  तांच्यो कायं कथा हावे वाचल्यों. 'पोवळ्या माळ', जावं 'उर्बा' अंकाखातरिवय तांची एक विनोदी शैलीतली कथा म्हाक धाडिल्ली.

विठ्ठलराय भट व्यक्ती कशी, कोण कितें काय, पिराय वो तांच्या हट बाबीबिशी म्हाका काय एक खबर नाशिली. ते फोन रेगूलर करतात आनी रेक्त पत्राकं जापो धाडतात, कामाचो पाठपुरावो करतात, ताका लागून ते फूलटायम बरोवपी म्हणपाचें उमगलें, तांचें भशेन म्हाका मात तत्परतेन त्यांच्या पत्रांक वा फोनाक जाय तशी दिवा शक्य जालेना. खासा जेन्ना हावं कोंकणी अकादेमीचो अध्यक्ष आशीलो तेन्नाच तांचेकडे म्हजो संपर्क जाल्लो. तांचें एक पुस्तक गौरेशि वेर्णेकारान प्रसिद्ध केलें आनी ताका अनुदान मेळचें म्हण गौरशि आणि विठ्ठलराय म्हजेकडे संवाद करून आशिले, पूण ताचे पुस्तक योग्य ते एवजणेत बसनाजालें, पूण त्या पुस्तकाच्या प्रकाशन सुवाळ्याक आमी कारवारात गेले आनी म्हाका याद जाला तेप्रमाणे हांवे त्या पुस्तकाचे विमोचन केलें.

विठ्ठलराय भट तो मेरेन म्हजे तकलेत तसो सुवात घेवन नाशिको, विठ्ठलराय भट नावांचो एक मनीस, जो मुंबय रावता, मूळ कारवार कर्नाटकातलो  कोंकणी भाशहेल्यान बरयता. बस्स. पूण इश्टागत तशें कायं नाशिलें, खूप आनी खंखचोय विशय घेवन बरयता. सगळे विशय बरयता खयच्याच साहित्य प्रकारचे फास्कें‌त रावनासतना येता तशें गायता वो बरयता. कथा, काव्य, निबंध, प्रवासवर्णन आनी हरेकप्रकार बरयता. साहित्याचो विमर्श समिक्षा करता, आवडलें, नावडलें

ते मोकळेंपणान सांगता. म्हजे कायं पुस्तकां ताणी तत्काळ वाचून काडली, आनी प्रतिक्रियाय सामकीच सांगली. उदाहरणार्थ हालीच 'बाबूश' ही कादंबरी, ताणी वाचली, बरे कथानक पूण कथानकांत मुंबय शारातलो बाबूंशा जो आयला तो चडआयलां अशें म्हाकर मोकळेपणान सांगलें, बाबूश मुंबय शारात आपणालें भुरगेंपण घालयता, ते अर्थपूर्ण अशें म्हाका दिसता. बाबूश मुंबयशार भोवता, राती-तितीचो तो जीणें समजूपाक आनी शिकपाक, ताका पुस्तकी-शाळेतलो शिकप स्वताखातरि घड महत्वाचें दिसनासी कारण, शिक्षण हे पोट भरपाचें साधन जाची स्वता बाबूशाक गरज नासली, तो गिरेस्ताको भुरगो, म्हणकच ते शिकप ना पूण जिणे जगपाचें आनी ते कशा तरेन चार चौगांच्या बऱ्याखाली आसूं येता ते भौशीक शिकपाक येता, देखून बाबूशान गरजेपुरते शाळे शिकण घेतलें, पूण फुडें जो वावर केलो, तो सामाजिक हिताचो. विठ्ठलरायाक हावें म्हळें तेन्ना तो गोयांत माया म्हयन्यात आयिले, ताजो भोवमान गोंमतका एके संस्थेन घडोवन हाडिल्ली. बाळेच्या मातृछायेच्या संकुलात तो रावतालो, थयं ताका मेळपाक हाव आणि सुफला गायतोंडे वांगडा गेले.

लेखक कसो पुस्तकामंदी असचो पुस्तकाविशीच उलोवचें आनी पुस्तकांक सगळे देव-बीव मानपी विठ्ठलराय म्हाका एक वेगळो-आगळो मनीस दिसलो. मन मोकळो, स्पश्ट आनी वायट बरे तोंडार सांगापी.

ताजी पिराय ८० वर्सां हे तेन्ना समजलें, पूण ताजे शारीरिक व्यांग पयलें दिसलें ते सदाशिव गडार साहित्य संमेलनाक विठ्ठलराय सभागृहात भितर सरलें तेन्ना, कारण विठ्ठलराय हो एक मध्यमरिपयिचो धडधाकट मनीस आसुये असो म्हजो अदमास असलो, तेन्नाच्यान विठ्ठलराय भटा विशी म्हज्या मनात आदर जालो, पणजे तोबोळी मातृछायेत रावपाक आयत्यात म्हण समजलो तेन्ना सुफला वांगडा हांवूय विठ्ठलरायांचे भेटेक गेलो. खूप बरें दिसले ताणी मेजार मांडून दवरिल्ली सगळी पुस्तकां, म्हळ्यार ग्रंथ पुजाच बादिल्यावरी दिसलें.

शाररीक दुर्बळपणां आसतनाय परिस्थितीचेर मात करून, कसलीच पिरंगण वो दुख्ख माननासतना इतलो उमेदीत एकवप, दुसऱ्यांक सन्मानीत करप, हें तांचे वागणें खूप भावलें.

विठ्ठलराय भट अशे तरेन म्हाका म्हजोय कोणतरी तेन्नासान भागीयोग सो दिसपाक लागलो, देखून हें सगळें बरवप म्हाका शक्य जालें.

विठ्ठलराय भटाक बरें आयुश्य-आरोग्य मेळू आनी निमणाखिणा मेरेन तो आनंदयात्री उरनं अशे मागला.



श्री. एन्. शिवदास हे कोंकणी - मराठीतील सिद्धहस्त लेखक. त्यांना 'साहित्य अकादमी' पुरस्कारसहित अनेक पुरस्कार लाभले आहेत. त्यांची 'भगदाड' ही मराठी कादंबरी बरीच गाजली. शिवदास हे गोवा कोंकणी अकादमीचे माजी अध्यक्ष आहेत.
संपर्क : ०९४२२४१७२३३ फार्मागुडी, फोंडा (गोवा)



# १९. लेखक बाबाची लेक

–नंदिनी पै

मी सौ. नंदिनी अवधूत पै (पूर्वाश्रमीची चि. नंदिनी. विठ्ठलराय भट यांची कनिष्ठ कन्या). मला ह्या लेखाद्वारे समस्त वाचकांच्या समोर माझे विचार मांडण्यात आनंद होत आहे.

माझे बाबा श्री. विठ्ठलराय देविदास भट हे दिनांक ५–५–२०१४ रोजी वयाच्या ८० व्या वर्षांत पदार्पण करीत आहेत. त्यांना माझ्या व समस्त पै परिवाराकडून खूप–खूप शुभेच्छा तसेच दीर्घआयुष्य लाभो हीच ईश्वरचरणी प्रार्थना.

मला माझ्या बाबांमधला लेखक बालपणापासूनच अनुभवायला मिळाला. ज्या वयात मला समज आली तेव्हापासूनच मी माझ्या बाबांना कधी रिकामं बसलेले बघितलं नाही. एकतर ते वाचनात किंवा काहीतरी लिहिण्यात दंग असत.

वाचनाची माझी आवड माझ्या बाबांनीच जाणीवपूर्वक वाढवली व जोपासण्यास मदत केली.

माझी आई नेहमी एक आठवण सांगत असे की मी रांगत असल्यापासून एखादं खेळणं घेण्यापेक्षा कागदाकडे धाव घेत असे.

बाबांबद्दल सांगायचे तर मला ज्या इंग्रजी शाळेत घालण्यात आले होते तेथील एक घटना सांगणे क्रमप्राप्त आहे. शाळेत आम्हाला वाचनाचा तास असल्यामुळे लायब्ररी सभासद होणे क्रमप्राप्त होते. ह्याचा फायदा मी वैयक्तिकरीत्या माझ्या बाबांच्या मार्गदर्शनाने नियमित घरी पुस्तके आणून वाचत असे. घरीसुद्धा अवांतर वाचन सुरूच असायचे. माझे बाबा रोज काहीतरी वाचन करून मगच झोपत. तीच सवय मला अजूनही आहे व ती मी आजतागायत जोपासली आहे.

बाबांनी लावलेल्या वाचनाच्या आवडीने मी ५ वीत असतानाही एक घटना सांगण्यासारखी आहे.

माझ्या अफाट वाचनाच्या वेडापायी मी शाळेच्या लायब्ररीतील सर्व पुस्तके वाचून संपवली. त्याचा परिणाम म्हणून माझ्या आईला शाळेतून सांगण्यात आले की आम्ही नंदिनीला लायब्ररीकार्ड देऊ शकत नाही. आईने ह्याचे कारण विचारल्यावर असे सांगण्यात आले की नंदिनीने तिची बहिण पद्मिनी व मैत्रीण वंदनाच्या नावावर पुस्तके घेऊन येथील सर्व पुस्तके वाचून काढली आहेत.

ह्याचा परिणाम असा झाला की आता काय वाचू ?

तेव्हा बाबांनी मला लागलीच खारमध्ये एका वाचनालयाचे सभासद करून टाकले. तेथेच मला मराठी वाचनाची गोडी लागली तसेच शाळेत हिंदी-राष्ट्रभाषा परीक्षा दिल्यामुळे हिंदीचे वाचनही विनासायास सुरू झाले.

त्यामुळे मराठी, हिंदी व इंग्रजी वाचनाची भुरळ पडली. त्यातच आता कोंकणी वाचनाची गोडी लागली आहे. कोंकणीचा सराव नसल्याने थोडे सावकाश वाचते इतकेच.

माझ्या साहित्यप्रेमी बाबांमुळेच माझे वाचन हे माझ्यासाठी अमृतकुंभासारखे झालेले आहे.

त्यांनी मला वाचनासाठी फक्त प्रोत्साहनच दिले नाही तर अजूनही विविध लेख, पुस्तके, हस्तलिखिते यांचे वाचन करण्यासाठी देतात.

वाचन हा माझा विरंगुळा नसून माझ्या वैवाहिक आयुष्यात आलेल्या चढ-उतारात मला बौद्धिक व मानसिक बळकटी देण्याचे ज्ञानाचे अखंड स्रोत ठरलेले आहे.

माझ्या कन्येलाही (अनिशा) वाचनाची आवड असून ह्याचे श्रेय माझ्याइतकेच माझ्या बाबांनाही जाते. अशा ह्या माझ्या लेखक बाबांबद्दल माझी शब्दांची सुमनांजली त्यांच्या चरणी अर्पण करीत आहे.

***





सौ. नंदिनी अवधूत पै या बी.कॉम. पदवीधर आहेत. अनेक आस्थापनांतून काम करून आता निवृत्ती घेतली आहे. जमेल तेव्हा मुलांची शिकवणी घेतात.
संपर्क : ०९८१९२६१५०२ टिटवाळा (पूर्व), जि. ठाणे



# 20. A Dear Friend

-Venkatesh V Bhat

It is a great pleasure for me to pen down few thoughts about Shri Vithalray D Bhat who has been a close friend to my father late Shri Vithal Venkatesh Bhat and Guru to me. It could not have been a greater occasion that this Guru Purnima that I have this chance to mention few words about him. My late father would have been equally happy to put down these words, but nevertheless on his behalf I am taking this opportunity to do so. I got to know Vithal Uncle through my father ever since I was a child. I have always grown up getting to hear about their childhood stories, school days, how Kadwad was during their days and the changes they have seen through as they grew and the hardships that they went throughout post moving to Mumbai and their journey. There was rarely a day when my father would miss talking about Vithal Uncle and their family members and it showed how he missed his dear friend. I did have one of those opportunities to accompany my father to his place in Ambivili and that was when I also met Mrs. Anuradha Bhat and thier daughers- Padmini and Nandini.

I consider myselves fortunate to have received and read copies of his various publications and always admire him to be a great poet, history expert, story writer and essay writer. His books have been very lucid, articulated and easy for people of any age group to read. My personal favourite amongst the many that I have read has been the book on "Karwar", which has given me additional information about my native place. Also one of his initial publications "The Roots" has been a fantastic read

which I am sure will be an informative for the next generation to come. The other various publications on India's leader personalities like Rabindranath Tagore, Mahatma Gandhi, Indira Gandhi, Sane Guruji, Sardar Vallabhbhai Patel etc. have also been a very handy read for my sons in their school curriculum. Needless to say therefore that all his publications have been useful for people of various age groups. Vithal Uncle's enthusiasm, inspiration and positive attitude towards life, is also clearly visible through his publications.

On behalf of my parents I would like to thank dear Vithal Uncle for all the support, direction, guidance that he was rendered throughout his books. I wish him health, wealth and prosperity forever and ever.



Mr. Venkatesh Bhat was born on Dec. 26, 1971 in Mumbai. He graduated in Law and is working as a Vice President for a mult-national organization. Contact : 9820684475 Pune.



# २१. माणूसवेडा...!

–वसु भारद्वाज

लेखक होणं आणि लेखक असणं, यामध्ये महत्त्वाचा असा फरक असतो. तसाच एक फरक मोठं असणं आणि मोठं असल्यासारखं दाखवणं यातही असतो. लेखक होणं म्हणजे काय हे जवळपास प्रत्येकास माहिती आहे. प्रत्येकानेच काही ना काही लिहिलेलं असतं. त्यामुळे जो कुणी लिहिण्याचा प्रयत्न करतो, तो लेखक असतो. पण लेखक असणं हा मात्र एकवेगळा विषय आहे. त्यामुळे केवळ लिहिणं एवढंच अभिप्रेत नसतं, तर लेखकाजवळ काहीतरी प्रतिभेची देणगी असावी लागते. ती असेल तर प्रश्नच नाही, त्याचा हात सतत लिहिता राहतो. तसं नसेल तर मात्र लेखन हे एक ओझं बनून गेलेली प्रक्रिया असते. मग काहीतरी निमित्त काढून काहीतरी लिहित राहाणं, ते प्रकाशित करणं, हे एक काम बनून गेलेलं असतं. व्यक्ती मुळातच लेखक असेल तर त्यासाठी कसलंही लेखनहेही एक सहजता असते. ते त्याच्या श्वासाइतकच सहज बनलेलं असतं. मग अशी व्यक्ती ही सहजच असते. आपण मोठे आहोत, असा कुठलाही अभिनिवेश त्यांच्याजवळ नसतो. श्रेष्ठत्वाचे त्यांचे निकष हे कर्तृत्वावर अवलंबून असतात. मी मोठा आहे, हे सिद्ध करण्याची कुठलीही गरज त्यांना पडत नाही. त्यासाठी माणसं गोळा करणं, कंपूशाही करणं, स्वतःचा उदो उदो करून घेणं, असल्या कुठल्याच गोष्टीची त्यांना गरज नसते.

साधारण वर्षदीडवर्षापूर्वी मला असाच फोन आला. दिवाळी अंक नुकतेच बाजारात आले होते. लोकांचं अद्याप दिवाळीअंक चाळणं सुरू असावं, तेव्हा मला आलेला हा पहिला फोन होता, ''मी विठ्ठलराय भट बोलतोय. तुमची कथा वाचली. मला फार आवडली. तसं मी पत्र तुम्हाला पाठवेनच. पण वाचून

अगदी राहावलं नाही, म्हणून फोन केला.'' सुस्पष्ट शब्दातलं बोलणं असले तरी एक वेगळा गोडवा आणि एक वेगळा बोलीभाषेचा हेल त्यामध्ये होता. मी कुठले आहात, वगैरे विचारण्याचा प्रयत्न करेपर्यंत भट सरांचं परिचय करून देणं झालंही होतं. सर मूळचे कारवारकडचे असून कोंकणी आहेत, हे मला कळलं. तोपर्यंत बऱ्याच लोकांच्या प्रतिक्रिया वेगवेगळ्या लेखनासाठी आल्या होत्या, पण कोंकणी माणसांच्या काही नव्हत्या. मी त्यांच्या बोलण्यातून नारळपाण्याचा आस्वाद घेऊ लागलो. प्रत्येक शब्द म्हणजे जणू उकडीचे मोदक! आपुलकीचा वाटावा असा आणि स्नेहाचा !

ते लेखक असावेत, असा मला अंदाज आला म्हणून मी त्यांना विचारलं, 'सर, तुम्हीही लिहिता का ?'आणि मला आश्चर्याचा धक्का बसला. सत्तर ऐंशीच्या वर ज्यांची पुस्तकं आहेत आणि जे केवळ मराठीच नाही तर कोंकणी आणि इंग्रजीतूनही लेखन करतात, म्हणजे करू शकतात, असे एक अनुभवसमृद्ध लेखक माझ्याशी बोलत होते. 'इये मराठीचिये नगरी' पाचपंचवीस लेख लिहून लेखक म्हणवणाऱ्या चार दोन ग्राम पातळीवरील संमेलनामध्ये कविता आळवणाऱ्या, स्वतःची पुस्तकं छापवून आणणाऱ्या आणि नाना क्लृप्त्या करून, ओढूनताणून पुरस्कार मिळवणाऱ्या आणि सतत व्यासपीठावर माईक हातामध्ये घेऊन समोरच्या श्रोत्यांना वास्तवतेची प्रखर जाणीव, समाजातील दुःखाचं चित्रण गंभीर चेहरा करून सांगणाऱ्या स्वयंघोषित साहित्यिकांपेक्षा हा एक वेगळा माणूस आहे, याची मला प्रथमच जाण झाली. स्वतःहून फोन करून मला तुमचं लेखन आवडलंय असं सांगणारा लेखक सध्या सशाच्या शिंगाइतका दुर्मिळ झालाय. त्यात ज्येष्ठ लेखक म्हणजे तो फक्त लिहिणाराच असला पाहिजे असं नाही, तर मराठी साहित्य विश्वातलं सव्यापसव्य त्याला माहिती असावं लागतं. प्रत्येक चळवळीची बलस्थान आणि दुखऱ्या नसा त्याच्या मेंदूत घर केलेल्या असाव्या लागतात. कोणत्या माणसाशी ओळख ठेवायची आणि ती कुठपर्यंत ठेवायची याची प्रमेयच पाठ करावी लागतात. पुरस्काराच्या वर्तुळाचं नेमकं क्षेत्रफळ किती आणि केंद्रबिंदूपासून परिघापर्यंत त्रिजेमध्ये असणाऱ्या प्रत्येक बिंदूला नेमकं

काय दिलं म्हणजे तो पुरस्कार अलगद आपल्या घरी येतो, याची भूमिती माहिती असावी लागते. काय बोललं म्हणजे कोण खूश होणार आणि मग आपली साहित्यिक कारकीर्द निर्विघ्न कशी होणार याचे आडाखे असतात, परिश्रमपूर्वक आणि अभ्यासपूर्ण साहित्यनिर्मिती करणाऱ्या साहित्यिकांना सतत अनुल्लेखाने कसं टाळायचं, याचं एक तंत्र असत. ते जमलं म्हणजे आपला कंपू आपली उदो उदो करतो आणि मग त्यांना लहान केल्यामुळे आपण आपोआपच श्रेष्ठ ठरतो. हे असे निकष ज्या क्षेत्रामध्ये आहे, त्याच साहित्यक्षेत्रामध्ये भट सरांसारखा स्वतःहून फोन करून 'तुम्ही लिहिलेलं आवडलं, बरं का' असं सांगणारा एक माणूसपण जपणारा लेखक आहे, ही पण आश्चर्याची बाब आहे.

काही दिवसातच भट सरांनी मला पाठवलेली पुस्तकं माझ्याकडे आली. त्यांचं विविधांगीलेखन पाहून मी आश्चर्यचकित झालो. क्रांतिवीरांपासून ते थेट अमर्त्यसेनसारख्या अर्थतज्ज्ञापर्यंत व्यक्तिमत्त्वाची चरित्रे, पोंवळ्यामाळ सारखा कोंकणी कथासंग्रह, आत्मचरित्राचे 'नोकरनामा', 'जांबावली ते आंबीवली' वगैरे भाग, 'सरस्वतीचे दशपुत्र, इये ग्रंथाचिये नगरी' सारखे साहित्यविषयक परिचय करून देणारी पुस्तकं, इंग्रजीतील पुस्तकं, तत्त्वज्ञानाविषयक लेख, वगैरेवगैरे बरेच लेखन त्यांच्या नावावर आहे. मुख्य म्हणजे अतिशय सरस भाषेमध्ये आहे. एकही शब्द परिचयाचा नसताना मी त्यांचा 'घाण्याचो बैल' हा कोंकणी कथासंग्रह एका बैठकीत वाचून काढला आणि मुख्य म्हणजे कथा कळण्यात कुठलाच अडथळा आला नाही. भाषेचा परिचय नसताना एखाद्या भाषेतला कथासंग्रहवाचून तो कळण्याची माझी पहिलीच वेळ होती. कोंकणी माणसाचं जीवनमान, त्यांची दैनंदिनी आणि त्यातून सरकत जाणाऱ्या या घटना याचं तरलचित्रण मला प्रथमच सोप्या पण प्रभावी भाषेमध्ये वाचायला मिळालं. प्रत्येक कथा म्हणजे एकवेगळा अनुभव होता. त्यांचा पोंवळ्या माळ ही तसाच! कोंकणीभाषेच्या वेगळेपणाची जाणीव करून देणारा एकवेगळा कथासंग्रह! मुळात कोंकणी भाषाच गोड आणि त्यात भट सरांचंलेखन... शहाळ्याच्या पाण्यासारखं, स्वच्छ आणि पचायला सोपं!

भट सरांचं वैशिष्ट्य म्हणजे ते फक्त एखाद्याचं साहित्य वाचून त्याला फोन करून थांबणारे नाहीत. ते आवडलेल्या लेखकाच्या लेखनाच्या झेरॉक्स कॉपी करून इतरांना पाठवण्याचं शारदेचं एक अजब व्रतही पाळतात. समर्थ रामदासांच्या 'उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा, शब्द निवडून बोलावा'चं ते चक्क प्रात्यक्षिक करू शकतात. त्यांच्यामुळे श्री. मधुकर पै, श्री.ल.सि. जाधवसर यांच्यासारख्या मोठ्या लेखकांशीही परिचय झाला. 'तुमची कथा वाचली. भट सरांनी माझ्याकडे कॉपी पाठवली,' हे ऐकून मलाच लाजल्यासारखं झालं. एवढा मोठा माणूस स्वतःहून आवडलेलं लेखन लोकांपर्यंत पोहचवतो आणि तेही स्वखर्चाने ही बाब दुर्मिळ आहे.

कोंकणातल्या ग्रामीण भागातलं जीवन, शिक्षणाची फारशी सोय नसलेल्या गावातलं जगणं, गरिबी, त्यात वाट्याला आलेलं अपघाती अपंगत्व हे सारं बाजूला सारून कुणाही धडधाकट आणि सुविधासंपन्न माणसाला लाज वाटावी असं त्यांचं साहित्यक्षेत्रातलं कर्तृत्व आहे. अमेरिकेच्या बायोग्राफिकल इन्स्टिट्यूटने ९६ साली 'मॅन ऑफ द इयर' पुरस्कार देऊन त्यांना सन्मानित केलं ते काय उगीच नाही.

भट सरांचा केव्हाही फोन आला की, 'भेटूया, आलात की या' असं आग्रहाचं निमंत्रण असतं. प्रत्यक्ष भेट होईलच, तेव्हा कोंकण दर्शनाचा आनंद मला पुन्हा घेता येणार हे निश्चित ! साहित्य निर्मिती आणि माणसांविषयीचं निरालस प्रेम हे भट सरांच्या दीर्घायुष्याचं खरं रहस्य आहे. कुठलाही हेतू मनात न बाळगता माणसांवर प्रेम करण्याचं एक वेड त्यांच्याजवळ आहे. त्यामुळेच त्यांच्या चाहत्यांची आणि त्यांच्या साहित्यावर प्रेम करणाऱ्याची संख्याही खूप आहे. त्यांना असंच आयुष्य शंभर वर्षेपर्यंत लाभो आणि आमच्यासारख्या नवख्या लेखकांना ते असेच प्रेरणा देत राहोत ही ईश्वरचरणी प्रार्थना आहे.

***

श्री. वसु भारद्वाज हे एच.एम.एस., बी.ए. (संस्कृत, तत्त्वज्ञान), एम. ए.(तत्त्वज्ञान) असे उच्च विद्याविभूषित आहेत. त्यांचा व्यवसाय वैद्यकीय आहे.

त्यांचे साहित्यातील योगदान : विविध दीपावली अंकातून २७ कथा व चंद्रकांत, नवल, अधिष्ठान, दीपावली अंकातून ४ कादंबऱ्या प्रकाशित तसेच पाच अनुवादिक पुस्तके प्रकाशित.

पुरस्कार आणि सन्मान :

महाराष्ट्र राज्य शासनाचा उत्कृष्ट वाङ्मयनिर्मिती पुरस्कार २००७

पुणे विद्यापीठ, मराठी विभागातर्फे भय, गूढ आणि रहस्य कथालेखक म्हणून गौरव

कै. व.दि. कुलकर्णी स्मृती समितीचा संतसाहित्य, संशोधन आणि समीक्षा पुरस्कार

पुणे नगरवाचन मंदिराचा संतसाहित्य पुरस्कार

संगमनेर इतिहाससंशोधन मंडळाचा अनंत फंदी पुरस्कार

शिवशंभो प्रतिष्ठानाचा साहित्यरत्न पुरस्कार इ.

संपर्क : राहुरी (जि. अहमदनगर),

भ्रमणभाष - ९८५०७७८९४८, ९४०४११३२१२

# २२. मला कळलेले भट सर

– अनुराधा गानू

श्री. विठ्ठलराय भट सर हे कधीतरी रुग्णाश्रयात १–२ दिवसांसाठी येत असत. कोरगावकर सरांच्या ओळखीचे कोणीतरी लेखक एवढाच त्यांचा आणि माझा परिचय. ते एवढ्या मोठ्या उंचीचे लेखक, साहित्यिक आहेत याची मला कल्पनाही नव्हती. मागच्या वर्षी २–३ दिवस ते रुग्णाश्रयांत आले होते. त्यावेळी मातृछायेची स्मरणपत्रिका त्यांना मिळाली. त्यातील माझा लेख त्यांनी वाचला. त्यांनी कोरगावकर सरांना विचारले, ''या अनुराधा गानू कोण ? मुंबईच्या तर नव्हे ?'' सरांनी त्यांना सांगितले, ''या आमच्या रुग्णाश्रय कार्यकारिणीच्या सचिव आहेत. या पण लिहितात.'' सरांनी माझी त्यांच्याशी ओळख करून दिली. ''तुमची लिखाणाची फाईल असली तर द्या. बघतो वाचून'' असं त्यांनी मला सांगितल्यावर मी खरोखरच माझ्या लिखाणाची फाईल त्यांना दिली. श्री. मधुकर पै यांनी त्यांच्या लेखात लिहिल्याप्रमाणे 'नवोदित लेखकांना प्रोत्साहन देणारे, नवोदित लेखकांच्या पाठीशी उभे राहणारे लेखक' असा जो उल्लेख केला आहे त्याचे प्रत्यंतर मला आधीच आले होते.

भट सरांनी माझे लेख अगदी शब्द न शब्द वाचले. लेखांमधल्या बारीकसारीक चुकाही सांगितल्या. मला काही सूचनाही केल्या आणि अतिशय चांगले मार्गदर्शनही केले. म्हणाले, ''मला तुमचे लेख आवडले. त्यांत एक चांगलं सामाजिक सूत्र आहे. एक चांगला लेखसंग्रह होईल; पुस्तक काढा ना.'' असं म्हणत म्हणत स्वतःच्या मोबाईलवरून त्यांनी पुण्याच्या मुक्तांगण प्रकाशनच्या श्री. राजू भानारकर यांना पुस्तक प्रकाशनाबद्दल सांगूनही टाकलं.

एवढ्या मोठ्या लेखकाने माझ्यासारख्या एका सामान्य स्त्रीने लिहिलेले लेख वाचावे, त्यावर मला मार्ग्रदर्शन करावं याचा मला अपरिमित आनंद झाला.

माझे लेख कधी काळी पुस्तक रूपाने प्रकाशित होतील असं मला कधी वाटलंच नव्हतं, त्या माझ्या 'अनुत्तरीत' या लेखसंग्रहाच्या पुस्तकाचं ६ महिन्यांत प्रकाशन सुद्धा झालं. असे असतात योगायोग. भट सरांची मी खूप खूप ऋणी आहे.

खरोखर जे घडायचं असतं ते घडतच. पण त्यासाठी कोणीतरी, काहीतरी निमित्त लागतं. हे निमित्तच अतिशय महत्त्वाचं असतं. तसंच माझं झालं. भटसर रुग्णाश्रयांत आलेच नसते तर त्यांचा आणि माझा परिचय झालाच नसता. त्यांच्याशी माझा परिचय व्हायलां निमित्त ठरले गोव्यांतील एक प्रसिद्ध लेखक श्री. मनोहर कोरगावकर. कोरगावकर सरांशी माझी ओळख व्हायला निमित्त ठरला मातृछायेचा प्रकल्प. असो.

प्रकाशक राजू भानारकर यांना फक्त सांगूनच ते थांबले नाहीत तर सतत त्या गोष्टीचा पाठपुरावाही केला. सतत ते माझ्या व भानारकरांच्या संपर्कात राहिले. प्रूफ रीडिंग झालं का ? कव्हर पेजचं काय झालं? मागच्या कव्हरवर तुमची सगळी माहिती द्या. पुस्तक कधी छापून होणार आहे ? प्रकाशन कधी करणार आहात ? एक ना दोन. असंच ते भानारकरांनाही विचारत होते. खरंच एखाद्या नवोदित लेखकाच्या पुस्तकासाठी इतक्या आत्मियतेने पुढाकार घेणारा एखादाच ख्यातनाम साहित्यिक असेल. ते सगळं बघून खरंच मला उगीचच लेखिका वगैरे झाल्यासारखं वाटलं. आणि नवीन नवीन काहीतरी लिहिण्यासाठी दुप्पट बळ आलं.

त्यांनी मला नंतर त्यांची आणि इतरही काही लेखकांची पुस्तकं भेट म्हणून पाठवली. त्यांनी स्वतःची सही करून माझं नाव घालून मला पुस्तकं भेट म्हणून पाठवावी याचं मला खूप अप्रूप वाटलं. नंतर १६ फेब्रुवारी २०१४ रोजी माझ्या 'अनुत्तरीत' या पुस्तकाचं प्रकाशन झालं. पण भटसरांना त्या कार्यक्रमाला येता आलं नाही याचं मला वाईट वाटलं. पण शुभेच्छा देणारं एक सुंदर पत्र त्यांनी या कार्यक्रमाला हजेरी लावण्यासाठी पाठवलं होते. ते पत्र समारंभात वाचून दाखवलं.

'साहित्यमग्न' म्हणण्यापेक्षा 'साहित्य=भटसर' असं म्हटलं तर ते चुकीचं ठरू नये. अशा या भटसरांना त्यांच्या ८० व्या वाढदिवसानिमित्त मनापासून

खूप खूप शुभेच्छा. खरं तर त्यांना शुभेच्छा देण्याइतकी मी मोठी नाही. म्हणूनच सरांना उत्तम आरोग्य व दीर्घायुष्य लाभो हे त्यांच्या वाढदिवशी माझे परमेश्वराकडे मागणे.

खरंच माझ्यासारखे कितीतरी लहान लहान अनेक लेखक असतील पण भट सरांसारखा मार्गदर्शक सगळ्यांनाच लाभतो असं नाही. म्हणूनच मी स्वतःला भाग्यवान समजते.



श्रीमती अनुराधा गानू ह्या पुणे विद्यापीठाच्या बी.ए. (इकॉनॉमिक्स) पदवीधर असून त्यांनी काही काळ पुणे येथील किर्लोस्कर ऑईल इंजिन्स या नामांकित कंपनीत काम केल्यानंतर अनेक ठिकाणी शिक्षिका म्हणून नोकरी केली. श्रीमती गानू यांना सामाजिक कार्याची आवड असून अनेक संस्थात त्या कार्यरत पदाधिकारी आहेत.

सातत्याने सदरलेखन त्या करत असतात. त्यांचं दुसरं पुस्तक लवकरच प्रकाशित होणार आहे.

संपर्क : ०९६७३११००४६ सांताक्रूझ (गोवा)



# २३. १०१ साहित्यकृतीचे साधक

–रवी कसबेकर

कारवार तालुका हा अनेक ख्यातकीर्त विद्वान, साहित्यिक, कलाकार, समाजसुधारक, शूरवीर सेनानी यांचे जन्मस्थान आहे. अशा लोकांच्या मांदियाळीत ८० व्या वर्षात पदार्पण केलेल्या साहित्यरंगात अजेय असे शतक पार करून १०१ साहित्यकृती प्रकाशित करणारे मराठी,कोंकणी व इंग्रजीत लेखन करणारे श्री. विठ्ठलराय देवीदास भट हे एक.

कारवार जवळील काडवाड गावातील ब्राह्मण वाड्यावर ५.५.१९३५ रोजी जन्मलेले विठ्ठलराय भट, बाड येथील न्यू इंग्लिश स्कूल येथून एस.एस.सी. पर्यंत शिकले. पोटापाण्यासाठी वंशपरंपरांगत चालत आलेली वैदिकी (पौरोहित्य) वृत्ती करण्याचे नाकारून त्यांनी सरकारी निमसरकारी व खासगी अशा १५ आस्थापनांतून नोकरी करून निवृत्ती पत्करली. नोकरीच्या काळात जराही स्वाभिमानाला धक्का लागला त्यावेळी त्यांनी न अनमानता मागील पुढील विचार न करता राजीनामे दिलेले आहेत. हा त्यांच्या करारी जीवनाचा अविभाज्य असा भाग आहे. जीवनभर कोणत्याही प्रलोभनाला बळी न पडता कुठल्याही धमकीला न घाबरता आणि तत्त्वे, सिद्धांत यांच्याशी तडजोड न करता त्यांनी आपले आयुष्य जागवलेले आहे हे व्यवहाराविरुद्ध कठोर स्वभावाचे असे वाटत असले तरी त्यांचे मन मुलासारखे मुग्ध व आईसारखे ममताळु आहे.

कर्मभूमी महाराष्ट्रातील मुंबई असली तरी त्यांना आपली जन्मभूमी कारवारबाबत अतीव प्रेम, त्यामुळेच त्यांनी २ ते ५ मे २०१४ पर्यंत चाललेल्या कारवार उत्सवात आवर्जून भाग घेतला. उत्सवाच्या आयोजकांनी पण त्यांच्या साहित्य रंगांतली भव्य कारकीर्द पाहून जाहीर सत्कार केला. त्यावेळी त्यांना 'करावळी सकाळ' (Coastal Morning) या दैनिकाच्या वार्ताहराबरोबर

आपले कारवार प्रेमाबाबत बातचीत केली. 'कारवारी कोंकणी' भाषेला असलेलं माधुर्य अन्य कोणत्याही भाषेला नाही. कोंकणी भाषेला उज्ज्वल भविष्य आहे. कारवारकरांनी कुठेही असले तरी त्यांनी आपण कारवारकर आहोत हे विसरु नये.

विठ्ठलराय भट यांचे मराठी, हिंदी, इंग्लिश, कन्नड, कोंकणी ह्या भाषांवर प्राविण्य आहे. तसेच संस्कृत भाषेवर पांडित्य आहे. इंग्लीश ५३, मराठी ४४, कोंकणी ४ अशी त्यांची प्रकाशित पुस्तकांची संख्या आहे. साहित्यरंगात आत्मचरित्र, चरित्र, तत्त्वज्ञान, विनोद, ललितलेख, काव्य, कथा इ. क्षेत्रात साहित्य साधना केलेली आहे. मराठीत लिहिलेल्या 'क्रांतीवीर भगतसिंग' या पुस्तकाच्या आठ आवृत्या निघाल्या आहेत. तसेच 'सामाजिक क्रांतीचा अग्रदूत -डॉ.बाबासाहेब आंबेडकर' या त्यांच्या जनमानसात स्थान लाभलेल्या पुस्तकाच्या पाच आवृत्या प्रकाशित झाल्या आहेत. कोंकणीत त्यांनी 'पोवळ्या माळ' 'घाण्याचे बैल' हे कथासंग्रह व 'गीतांजली' व 'काव्यांजली' हे काव्य संग्रह प्रकाशित केले आहेत. इंग्लिशमधील ३ निबंधसंग्रह, ही पुस्तके विशेष गाजली आहेत. Kaliedoscope, Bouquet, Raincow ही पुस्तके विशेष गाजली आहेत. मराठीत विनोदी कथासंग्रह-'अजब भारतीय' व 'आम्ही हे असे' हे वाचकांना भावले आहेत.

गरिबी, अपंगत्व व उच्चशिक्षणाचा अभाव अशा परिस्थितीवर मात करून साहित्य संस्कृती, शिक्षण व समाजसेवा या क्षेत्रांत केलेल्या भरीव कामगिरीबद्दल American Biographical Institute या आंतरराष्ट्रीय संस्थेने त्यांना Man of the year - 1996 हा किताब देऊन गौरव केलेला आहे. शिवाय त्यांना अन्य अनेक पुरस्कार लाभलेले आहेत. कारवार उत्सव समितीने केलेलया सत्काराबद्दल हर्षभरित झालेले विठ्ठलराय भट म्हणाले, ''माझ्या घरातल्या लोकांनी केलेल्या सन्मानाने अतीव आनंद झाला'' असे नमूद केले.

''ज्येष्ठ साहित्यिक म्हणून तुम्ही आजच्या तरुणाईला कोणता संदेश द्याल?'' या प्रश्नावर - ''संकुचित मनोवृत्तीचा त्याग करा. जात, धर्म अशा बंधनांच्या

पलीकडे बघा. विश्व विशाल आहे. विश्व मनोभावनेसाठी जग आतूर आहे. विश्वमानव म्हणून जगण्याचा प्रयत्न करा.

याचाच धागा पकडून त्यांनी एक हिंदी रचना म्हणून दाखविली –

मंदिर मसजिद गिरिजा घरमें
बाट दिया भगवानको।
धरती बांटी सागर बांटा
मत बांटो इनसानको ।।

साहित्याच्या प्रांगणात सरस्वती देवीच्या प्रसादाने श्रेष्ठ पुत्र म्हणून मिरवणाऱ्या 'कारवारच्या माती'च्या या मुलाला शुभेच्छा.

***

श्री. रवी कसबेकर हे बी.ए.पर्यंत शिकलेले असून, अनेक नोकऱ्या केल्या नंतर कारवारहून प्रकाशित होणारे प्रमुख कन्नड दैनिक 'करावळी मुंजाव' (Coastal Morning) याचे वार्ताहर म्हणून काम करतात. कन्नड भाषेवर त्यांचे अप्रतिम प्रभुत्व आहे. तरूण, तडफदार पण नम्र अशा रवीला उज्ज्वल भवितव्य आहे.
संपर्क : ०९९०२०४३४६० खारगेजुग (कारवार)



# २४. हमारे प्रिय बाबा

–नुसरत (रिंकी) मोहम्मद सुधु शाह

हमारे प्रिय बाबा श्री विठ्ठलराय भट जी हैं। हमारा पूरा परिवार बाबा को सात वर्ष से जानता है। बाबा बहुतही अच्छे लेखक हैं। बाबा का नाम देश–विदेश तक फैला हुआ है।

बाबा को अलग–अलग भाषाएँ आती हैं। बाबाजी ने मराठी, अंग्रेजी, कोंकणी इन भाषाओं में किताब लिखे हैं।

बाबा की उम्र अभी ८० वर्ष चल रहा है।

हम सब सोच में पड़ जाते हैं, कि इन्सान ६० वर्ष में ही रिटायर हो जाते हैं, लेकीन बाबा तो अभी ८० वर्ष के होके भी इतने अच्छे–अच्छे किताब, कहानी सोच समझकर अपने शब्दों में लिखते हैं। बाबा इतने मशहूर हो चुके है, कि बाबा का सपना भी पूरा हो चुका है।

बाबा का मन एकदम साफ–सुथरा है। बाबा को जो सही लगता है, वह फिर कोई भी हो, उसके सामने बोल देते हैं। मुझे ये आदत बहुत ही अच्छी लगती है।

बाबा को गन्दगी बिलकुल पसंद नही। बाबा कोई काम में पिछे नही हटते। कितना भी खर्चा हो उसे तुरन्त करवा लेते है।

बाबा खाने–पिने के बहुत ही शौकीन है। बाबा बहुत की मजाकी हैं। मजाक भी बहुत अच्छा कर लेते है, वैसे बाबा अपने बेटियों के पास रहते हैं, लेकीन जब भी हमारे यहाँ आते है, तो हम सब भाई–बहन के लिए तोफे ले आते है।

हम चार भाई–बहन है, दो भाई–दो बहने। बाबा सबसे ज्यादा प्यार सिर्फ मुझे और मेरे छोटे भाई सिराज से करते हैं। बाबा सबसे प्यार करते हैं। लेकीन हम दोनों से ज्यादा करते हैं।

बाबाजी कोई मुसिबत में होता है, तो उसे आगे का रास्ता दिखाते हैं। बाबा

ने बहुत से लोगों की सहायता की है ।

बाबा ने मुझे कहा है, कि जब तुम अच्छे नंबरोसे १० वी पास हो जाएगी तो अच्छे कॉलेज में भरती करवा दूँगा । मुझे खुदपे गर्व होता है, कि मेरे घर के बाजू में कोई लेखक रहता है।

बाबा को कायदा कानून अच्छी तरह मालुम है । बाबा की पहेचान बहुत जगहों पर है और जहां पर नही होती वहाँ पर वाचक बाबा कीं किताब पढ़कर बाबा से पहेचान हो जाती है।

बाबा अपनी दोनों पोतियों की तरह मुझे भी पोती मानते हैं।

मैं सोचती हूँ कि बाबा जैसें है, वैसे बने रहे। बाबा कि इच्छा है कि मेरी बारवी के बाद मुझे कोई अच्छी नोकरी लग जाए जिससे मुझे मेरी कामयाबी मिल जाए। बाबा मुझे हमेशा बोलते अच्छी तरह पढ़ाई करो, पढ़ाई के बिना जिंदगी बेकारसी रहती, फिर जिंदगी भर एक गम सा रहता है, कि काश मैंने पढ़ाई कर ली होती तो आज ये दिन देखने को नहीं मिलता । आज भविष्य इतनी तेजी से बढ रही है, कि कोई किससे कम नही होना चाहता है।

मैंने देखा है कि जिंदगी में अगर अच्छी तरह कामयाबी पाना है, तो श्री. विठ्ठलराय भटजी से सिखो।



कु. नुसरतने (रिंकी) यंदा ५८% गुण संपादन करून एस.एस.सी. परीक्षा पास केली. कॉलेज वा कोणतातरी कोर्स करून नोकरीत स्थिरावण्याचा तिचा मानस आहे. तिने शिलाईचा कोर्स पूर्ण केला असून मुलींचे फॅशनेबल कपडे शिवते. रिंकीकडे दुसऱ्यांना, खास करून आजारी व ज्येष्ठांना मदत करण्याची, सेवा करण्याची उपजत जाण आहे. स्वभाव पण मायाळू आहे. त्यामुळे शेजाऱ्या-पाजाऱ्यांची ती लाडकी बेटी आहे.

संपर्क : आंवटकर कंपौंड, आंबीवली (पश्चिम) जि. ठाणे

# २५. सादो, सरळ, सज्जन मनीस

– नागेश अणवेकर

साहित्य आणि कला क्षेत्रात वावुर आशिल्ल्या लोकांक जाय त्या लोकांली वाडत जाता. मगेली आणि विठ्ठलराय भट मामाली वळक सादाशिवगडांतु चलिल्ल्या कोंकणी साहित्य कार्यावळीन जाली. ती वळक निरंतर वाडतेर गेली. भटमाम- वयोवृद्ध,ज्ञानवृद्ध आणि अनुभवसिद्ध असो मनीस. सादो, सरळ, निगर्वी, सज्जन मनीस. माका तो खूब मानवलो.

भटमामाल्या म्होवाळ उतरांत हितचिंतक आणि मार्गदर्शक असो जांटो मनीस आसा. ताका लेखक, कवी मेळल्यार खुशी जाता.

भटमाम दरवरसा नंदनगद्दा हांगा आशिल्ल्या तांगेल्या भयणीगेर म्हयनोभर रावचाक मे म्हयन्यात येता. तेन्ना थंय लगीनच आशिल्ल्या माका आपोवन मगेल्या साहित्य वावराची म्हायती कन्न घेतात आणि खुशी जातात. केन्ना केन्ना चुको पण दाकोवन दितात. तो तांगेलो अधिकारच आसा, अशं हांव मानता. भट्टमामान अजून परयंत कोंकणी, मराठी आणि इंग्लिशल्यात शंभरा वयर पुस्तकां बरयल्यात. हे पळोवन कोणे अजब जावचीच गोष्ट! तांची काय पुस्तकां हांवें वाचल्यात. नांगेली चिंतन शीलता तोखणाय कतांरची अशी आसा.

हांव मजो सोनारकीचो धंदोसांबाळून कोंकणी आणि कन्नडांतल्यान साहित्यसेवा करतां, साहित्यिक कार्यावळीत भाग घेता. रेडिओ, दूरदर्शन आणि हेर चेनलोचेर कार्यक्रम सादर करतां. भट्टमामाल्या नजरेत मजी, कविता किते आयले की मुंबयचान तेन्नांच फोन कन्न शाबासकी दिता. माका उर्बा दिता. म्हजो हावेस वाडयता. तांचे मार्गदर्शन माका सदाच मोलाचे दिसता. भट्टमामान अशेच तरनाट्यांक मार्गदर्शन करतेर रावचे अशी म्हजी इत्सा.

भट्टमाम आतां ८० वरसांचे जाले. ते तांचेकडून पळोवन खरेंच दिसनां सदांच हासकुरे, प्रसन्नवदन, दुसऱ्याक धीर दिवचें व्यक्तिमत्त्व. ताका खूब आयुष्य मेळू तांची प्रकृती बरें दवरू अशें हाव देवाकडेन मागता.







(भामिनी षटपदित काव्य)

मातृभाषिक भट्टमामा
मूर्तरूपी जणु रावलेची
अर्थपूर्ण विषय, चिंतन सगळें साहित्यांतु
भर्ती जावचेलो वाव वदेंन
शर्त बांदुन फुडें राव्लेरी
वर्तमान कालचक्रात तशं
घुवतें आसु

***

श्री. नागेश अणवेकर सातत्याने कोंकणी व कन्नड भाषांतून काव्य, कथा, लेख असं लेखन करीत असतात. व्याकरण छंद रूपात कोंकणी काव्य रचना करण्याची त्यांची खासियत. त्यांचे तीन कोंकणी काव्यसंग्रह प्रकाशित झालेत. कोंकणी खंडकाव्य (पुराण) प्रकाशनाच्या वाटेवर आहे.

कर्नाटकातील प्रख्यात लोककला यक्षगान (दशावतार) यात नागेश पात्र धारण करून कथा सूत्रधार (भागवत) म्हणून यक्षगान सादर करतात.

संपर्क : ०९४४८८२७८९८ नंदनगद्दे (कारवार)

# २६. सुसंगतीचा गंध

- निवृत्ती सुतार

मी 'विचारे कुरिअर सर्व्हिस प्रा.लिमिटेड' या कंपनीमध्ये (कल्याण-A१) कुरिअर बॉय म्हणून काम करतो. कुरिअरच्या माध्यमातून माझी आणि लेखक श्री. विठ्ठलराय भट यांची भेट झाली.

आंबिवली हा माझा रूट असल्यामुळे लेखक श्री. विठ्ठलराय भट यांचे कुरिअर माझ्याकडेच येत असत. जेव्हा मी त्यांना पहिल्यांदाच भेटलो तेव्हा माझा वाचनाचा छंद जाणून त्यांनी मला 'जांबावली ते आंबिवली' हे पुस्तक शुभेच्छापूर्वक भेट दिले. त्यानंतर मी त्यांच्याकडून 'नोकरनामा', 'दूरदेशीचे नामवंत', 'नालंदा व तक्षशिला', 'मोर नाचरा हवा' ही पुस्तके विकत घेतली. त्यांचे लेखन वाचताना असे वाटे की आपण मनात अनेक इच्छा धरत असतो. त्यामध्ये सगळ्याच इच्छा काही पूर्ण होतात असे नाही. पण वाचन केल्याने आपण एखादी इच्छा धरतो आणि ती पूर्ण होते तेव्हा त्यातील आनंद काही वेगळाच असतो याची जाणीव झाली.

लेखक श्री. विठ्ठलराय भट यांचे 'जांबावली ते आंबिवली' या पुस्तकातील त्यांचे वैयक्तिक व कौटुंबिक जीवनाचे अनुभव, मूलभूत जिज्ञासा, 'नोकरनामा' मधील विविध नोकऱ्यांत आलेले अनुभव हे वाचल्यावर असे वाटते की जणू काही लेखकाने आपले बालपण, शिक्षण, कौटुंबिक जबाबदारी, अध्यापन व्यवसाय व भोवतालचे सामाजिक वातावरण यांचा आलेख उभा केलाय. त्यांचे हे लेख वाचून माझ्या मनात एक नवीन चैतन्य निर्माण केलं मला पण आता लेखक व्हायची इच्छा झाली आहे.

लेखक श्री. विठ्ठलराय भट यांना दीर्घ आयुष्य व उत्तम आरोग्य लाभू दे, हीच प्रार्थना.

***

श्री. निवृत्ती सुतार
अंबर्जे, ता. शहापूर, जि. ठाणे ,
संपर्क - ०९२७३८९७७६९



# २७. कृतार्थ मी, कृतज्ञ मी

– विठ्ठलराय भट

मी एक स्वप्न पाहिलं होतं. साठेक वर्षांपूर्वी. लेखक होण्याचं. लेखक होण्यापूर्वी मी बऱ्यापैकी वाचक होतो. माझे थोरले काका श्री यशवंत भट यांना आम्ही होडलो बाप्पा म्हणत असूं; ते ज्ञानकांडातील प्रकांड पंडित व मर्मज्ञ.

आमचं घराणं पुरोहितांचं. संस्कृत पंडितांचं. आजोबांच्या वेळी गुरूकुल पद्धतीने चाळिसेक विद्यार्थी आमच्या घरी शिकत असत. आमचं घर प्रशस्त. चौकी (व्हरांडा) लांबलचक. तो वारसा होडलो बाप्पापर्यंत चालत आला होता. ते संस्कृत पंडित तर होतेच तसेच धर्मशास्त्राचे गाढे अभ्यासक पण होते. त्यांनी आमच्या समाजाच्या स्वामींना पण शिकवलं होते.(म्हणजे स्वामींनी संन्यासदीक्षा घेईपर्यंत) होडलो बाप्पाच्या घरी संस्कृत, मराठी, कोंकणी, हिंदी, कन्नड व काही इंग्रजी पुस्तके यांचा खच होता. शिवाय वर्तमानपत्रे व मासिके पण असायचीच.

माझ्या जन्माच्या अगोदरच ते विधुर होते. त्यांना अपत्य नव्हते.मी त्यांचा धाकटे बंधु बाबन (देवीदास) यांचा थोरला मुलगा. माझ्या मागे पाच भावंडे, मी थोरल्या काकांचा लाडका. त्यांच्या अवती भवती घोटाळत असे. मला संगतीला घेतल्याशिवाय ते सकाळचा चहा, नाश्ता घेत नसत. त्यांचा आवडीचा नाश्ता म्हणजे गरम मसाला घालून केलेले तिखट पोहे. त्यात भरपूर साखर. सू सू करत ते पोहे खात असत.

होडल्या बाप्पांच्या घरी चर्चा, वादविवाद, काव्यशास्त्र विनोदासाठी अनेक शास्त्री, पंडित अधूनमधून येत असत.आठवड्याचे आठवडे राहत. रात्रंदिवस त्यांच्या चर्चा, वादविवाद, हास्यविनोद यांना ऊत येत असे. पाहुण्यांची उठबस करणे, त्यांना लागणारी पुस्तके काढून देणे ही माझी प्रमुख कामे. श्रवणभक्ती चालू असे. मी लक्षपूर्वक त्यांची चर्चा ऐकत बसे. त्या सर्वांचा परिणाम, व संस्कार माझ्यावर नकळत घडत गेले.





पुस्तकांचा सहवास, त्यांचा वास, पुस्तकांबद्दल प्रेम, ममता यांची चटक लागली. आधी मासिके चाळणे, पुस्तके वाचणे अशा प्रकारे मला वाचनाचा छंद जडला. त्याचीच परिणती पुढे सहा भाषांतील हजारो पुस्तके वाचण्यात झाला. वाचन आनंद भरपूर, पुरेपूर लुटला. व्यक्तिमत्त्व संपन्न झाले. वाचना सारखा या जगात दुसरा परमानंद नाही. यावर माझा ठाम विश्वास आहे. वाचनातून पुढे लेखन करायला लागलो. माझं लेखन वाचकांना आवडत गेलं. मी मराठी, इंग्रजी व कोंकणीतून आजपर्यंत १०३ पुस्तके प्रकाशित केली. नाना विषय, नाना साहित्यप्रकार हाताळले. अजून लिहितच आहे.

लेखन करण्यासाठी लागणारी शांतता, स्वास्थ माझी दिवंगत पत्नी सौ. अनुराधा (पूर्वाश्रमीची कल्याणी/प्रेमा काशीनाथ भट) यांनी मिळवून दिली म्हणून ही मजल मारता आली.

वयाची ८० वर्षे कशी संपली समजलेच नाही. अनेक भले - बुरे अनुभव घेतले व अजून घेतच आहे. दर दिनी एक तरी नवा अनुभव घेतच असतो. आता नजर पैलतिरी लागली आहे. केलेल्या समाज कार्याबद्दल, दानधर्माबद्दल आनंद वाटतो. लेखनाने आत्मानंद दिला. वाचकांना तो आनंदाने वाटला. मुक्तहस्ते वाटला. अनेक प्राणप्रिय वाचक लाभले. काही माझ्या कुटुंबातील सभासद झाले. काही मानसपुत्र, मानसकन्या लाभल्या.

एकंदर जीवनाबाबत मी समाधानी आहे. तृप्त आहे. इथपर्यंतच्या वाटचालीत ज्यांनी ज्यांनी मदतीचा हात दिला त्या सर्वांचा मी चिर ऋणी आहे. शेवटी एवढंच म्हणेन .... कृतार्थ मी, कृतज्ञ मी.

***

संपर्क - आंबटकर कंपौंड आंबीवली (पश्चिम),
पो. मोहने, जिल्हा ठाणे - ४२११०२
मो. ९२२३३६५१९९, ९२२१३०९७५८





# कारवार उत्सव - २०१४

मे २, ३, ४, ५



प्रख्यात उद्योगपती श्री. किशोर अवर्सेकर हे
श्री. विठ्ठलराय भट यांचा सत्कार करताना.



कारवारच्या मातीचे सुपुत्र ज्येष्ठ साहित्यिक श्री. विठ्ठलराय भट यांनी आपल्या शंभराच्यावर प्रकाशित केलेल्या पुस्तकांद्वारे (मराठी, कोंकणी, इंग्रजी) कारवारचं नाव देश-विदेशात पोचले. त्याबद्दल त्यांचा प्रसिद्ध-उद्योगपती व युनिटी बिल्डर्सचे चेअरमन श्री. किशोर अवर्सेकर यांच्या हस्ते भव्य सत्कार करण्यात आला.

(सौजन्य : श्री. कृष्णानंद बांदेकर, कारवार)



मौर्या प्रकाशन